संगीत

# धर्मवीर संभाजी

( उद्बोधक ऐतिहासिक नाटक )

---

: लेखक :

गणेश कृष्ण बोडस




बलवन्त पुस्तक भाण्डार

गिरगांव नाका, मुंबई नं. ४.

क्रमांक ६

प्रकाशक :
त्रिंबक विष्णु परचुरे,
बलवन्त पुस्तक भाण्डार,
गिरगांव नाका, मुंबई ४.

आवृत्ति सातवी

मे १९६३

* * *

मुद्रक :
रामचंद्र शंकर जोरी,
इंदिरा प्रिंटिंग प्रेस,
१००५ सदाशिव पेठ, पुणें २.

* * *

किंमत १॥ रुपया

मुखपृष्ठावर छापण्यासाठीं स्वतःचें छायाचित्र दिल्याबद्दल श्री. विष्णुपंत वैशंपायन यांचे आम्ही आभारी आहों.

प्रकाशक

# तिसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना

श्रीछत्रपति संभाजी महाराजांच्या चरित्रावर, मराठी भाषेंत लहानमोठीं ८।१० नाटकें तरी असतील. असें असतांना आणखीं, प्रस्तुत नाटक लिहिण्याचें प्रयोजन काय? असा प्रश्न बऱ्याच वाचकांच्या मनांत उत्पन्न होण्याचा संभव आहे. तेव्हां त्यांच्या समाधानासाठीं पुढील खुलासा करीत आहें.

श्रीछत्रपति संभाजी महाराजांच्या चरित्रावरचीं आजवर प्रसिद्ध झालेलीं नाटकें वाचलीं असतां, संभाजी म्हणजे एक व्यसनी, बदफैली, नादान् राजा होता असा वाचकांच्या मनावर अनुचित परिणाम होतो व त्या थोर शिवपुत्राबद्दल अकारण अनादर उत्पन्न झाल्याशिवाय राहात नाहीं.

अलीकडे रा. बेंद्रे वगैरे इतिहासज्ञांनीं, संभाजी महाराजांसंबंधीं पूर्ण संशोधन करून, नवीन उपयुक्त माहिती मिळवून, संभाजी महाराजांच्या चरित्रावर जो नवा प्रकाश पाडला आहे, त्याला अनुसरूनच प्रस्तुत नाटकाची रचना मीं केली आहे आणि अशा रीतीनें धर्मवीर छत्रपति संभाजी महाराजांचें उज्ज्वल चरित्र नाट्यरूपानें महाराष्ट्र जनतेपुढें ठेवण्याचा यथामति प्रयत्न केला आहे.

श्रीशिवाजीमहाराजांच्या कैलासवासानंतर, मराठेशाही बुडवून टाकण्यासाठीं, औरंगजेब दक्षिणेंत जातीनें तळ देऊन बसला असतांना व गोव्याचा फिरंगी, जंजिऱ्याचा सिद्दी, मुंबईचा टोपीवाला हें त्रिकूट औरंगजेबाच्या अस्मानी सुलतानीला जोराची साद देत असतांना, ह्या रणझुंजारानें, सतत नऊ वर्षें खूप शर्थीनें लढून मराठेशाहीच्या साऱ्या शत्रूंना जबर बसविली; पण शेवटीं, घरभेद्यांच्या कसाबकरणीमुळें शत्रूच्या हातीं सांपडल्यावरहि, **स्वधर्मत्यागापेक्षां स्वधर्मरक्षणासाठीं प्राणांची आहुति देऊन "हुतात्मा संभाजी"** अशी अमर कीर्ति संपादन केली. महाराष्ट्राच्या इतिहासांतील इ. स. १६८० ते १६८९ हा कालखंड अपूर्व साहस, शौर्य, धडाडी, धर्मप्रेम आणि विजिगीषु वृत्ति या उज्ज्वल गुणांनीं ज्यांनीं ठायींठायीं अलंकृत केला; त्या धर्मवीर छत्रपति संभाजी महाराजांच्या चरित्रा-

वरील हें नवीन विचारांचें नाटक, तरुण महाराष्ट्राला उद्बोधक आणि मार्गदर्शक झाल्याशिवाय खचित् राहाणार नाहीं.

आमचे मित्र रा. **त्रिंबकराव परचुरे** मालक '**बलवन्त पुस्तक भाण्डार**', गिरगांव मुंबई यांनीं, सध्यांच्या अत्यंत महर्गतेच्या काळांत नाट्य-प्रकाशनाची जबाबदारी अंगावर घेऊन, ती यशस्वी रीतीनें पार पाडण्यांत एक प्रकारें साहसच दाखविलें आहे, त्याबद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी आहें. 'साहसे श्री प्रतिवसति' या न्यायानें सदर साहस त्यांना फलदायक झाल्याविना खात्रीनें राहणार नाहीं. तसेंच प्रस्तुत नाटक यशस्वी करण्यासाठीं आमच्या 'सुंदर सं. मंडळी' प्रमाणेंच अनेक अमेच्युअर नाट्यसंस्थांनीं फार मोठें साहाय्य केलें आहे, याबद्दल मी त्यांचाही ऋणी आहें.

तारीख
१५ ऑगस्ट १९४८. **गणेश कृष्ण बोडस**

## — सातवी आवृत्ति —

पूर्वींच्या आवृत्तींतील मुद्रणदोष दुरुस्त करून, ही सातवी आवृत्ति जशीच्या तशी छापली आहे. **प्रकाशक**

## 'धर्मवीर संभाजी' नाटकांतील पात्रें

१ संभाजी २ गणोजी शिर्के
३ कब्जी ४ औरंगजेब
५ दौलती ६ जोत्याजी
७ तकरीबखान

### — स्त्री पात्रें —

१ तुळशी २ राजकुंवर

यांशिवाय अरब, वजीर वगैरे

# धर्मवीर संभाजी

## ईशस्तवन

सकल संपद् गुणा, गजवदना गणेशा । थोर यश संधान ईशा । अर्पुनी, तव चरणीं । तनमनधन निरामय ॥ धृ० ॥ घोर दावानला नाशुनी । तारी शिवसुत विमल । विनवित तुज गणाधीश ॥

## अंक १ ला

### प्रवेश १ ला

( **स्थळ** : फोंडाघाट. चोहों बाजूंस निबिड अरण्य. मध्यें फक्त एक पाऊलवाट. **तुळशी** व **दौलतराव** प्रवेश करतात. )

#### पद २ रें

दौलत : चल गे साजणी जाऊं या, सदनाला ।
तुळशी : हळु हळु हळु हळु, चाला बाई ।
दौलत : बुडाला भानु, झाली ग रात ।
तुळशी : होईना ॥
दौलत : चलगे साजणी ॥ धृ० ॥
तुळशी : चालली नार नवतिची ।
दौलत : रात भीतिची ।
तुळशी : प्रीतिची वाट निर्भय अती । सखया रे ॥

**दौलत : चल गे साजणी ॥**
**तुळशी : हांसत डोलत, गुजगुज बोलत, जाऊं सख्या सदना ।**
**दौलत : निर्जन भासत, घडीघडी वाढत, चोंहिकडे अंधार ।**
**तुळशी : शिणली बाला, कंप तनूला ।**
**दौलत : कांपत हृदय पहा ।**
**तुळशी : जंगल नंदनवन जणुं खास । सखया रे ॥ चलगे ॥ १ ॥**

**दौलत** : तुळशी, चल उचल पाऊल जलदी. दिवस बुडायचा वखत आला. अंधार पडण्यापूर्वी ही छिनाल टेकडी उतरून पार झालं पाहिजे आपल्याला.

**तुळशी** : राजसा, माझा जीव अगदीं दमून गेला बघ. जरा टेकतें ह्या दगडावर ( बसते. )

**दौलत** : अशी कदमाकदमावर तूं टेकूं लागलीस, तर इथंच रात्र होईल आणि मग चंद्रमा उगवेपर्यंत, पुढील वाट आपल्याला चालतां येणार नाहीं. चल, ऊठ लवकर.

**तुळशी** : ही हो काय अशी घाई ? थोडा विसांवा तर घेऊं द्याल कीं नाहीं मला ?

**दौलत** : घरीं गेल्यावर तुला हवा तितका विसांवा देईन.

**तुळशी** : हो, उंबऱ्याच्या आंत एकदां बाईल गेल्यावर, आडमुठे पुरुष तिला थोडा तरी विसांवा देतात का ? त्यांतून तुम्ही म्होतुराचे पतिराज. तुम्ही तर मी दारीं जातांच बेजार करून टाकाल अगदीं.

**दौलत** : छे ! पाटाची बायको म्हणजे नाकापेक्षां मोती जड असं म्हणतात, तें कांहीं खोटं नाहीं.

**तुळशी** : आणि म्होतुराचा दादाला म्हणजे पायापेक्षां पायतण जाड, असं म्हणतात तेंहि अगदीं खरं ग बाई खरं !

**दौलत** : तुळशी, ही चेष्टा–मस्करी करीत बसायची वेळ नाहीं.

**तुळशी** : इश्य बाई ! दादलाबायकोनं रातच्यापारीं चेष्टा करायची नाहीं, तर काय चांगलं तांबडं फुटल्यावर का करायची ?

**दौलत** : तांबडं फुटल्यावर का पांढरं फुटल्यावर तें घरीं गेल्यावर सांगेन. हं, आतां लवकर हालूंदे तुझा हा झुलता मनोरा !

**तुळशी** : तुमच्या असल्या धिसाडघाईनंच तुमची पहिली बायको तुमच्या हातावर तुरी देऊन निघून गेली असावी.

**दौलत** : तिनं हातावर तुरी दिल्या, तूं डोक्यावर मिरीं वाटूं लागशील. हं, ऊठ जलदी.

**पद ३ रें**

**पुरे झाला विसांवा ऊठ झणीं सजणी ।**
**लागे माझ्या जिवास झुरणी ॥ पुरे० धृ० ॥**
**रात रानिची, लइ धोक्याची, नच त्राण,**
**अंगांत उरला ग ॥ १ ॥**
**क्रूर श्वापदा पिशाच्च चोरां ।**
**घांस आयताच मिळणार आपुला ग ॥ २ ॥**

**तुळशी** : सख्या, घराच्या ओढीनं जनावर धांवत सुटतं, तसे तुम्ही आपल्या घरीं जाण्यासाठीं दौड करतां खरे, पण आम्हां बायकांना, माहेर सोडून सासरीं जातांना, पावलोपावलीं अडखळल्यासारखं होतं हो !

**पद ४ थें**

**कां अशी घाई । शिणली अवघी तनु बाई । सोसत**
**मसी नाहीं । व्याकुळ जिव होई । म्होतुराचा नवा ।**
**थाट उडला जवा । निघे लवलाही ॥ कां अशी घाई०॥ धृ ॥**
**राजराजेश्वरा, डोळा फेका जरा ॥ चोळी चिंब होई ॥ १ ॥**
**धीरे धीरे चला । दम घेऊं द्या मला । केवी लगीन घाई ॥२॥**

**दौलत** : तुळशी, तुझ्या ह्या दिरंगाईनं घडीघडीनं काळोख मात्र वाढत चालला आहे आणि त्याचबरोबर या दौलतरावाच्या मनाची भीतीहि दुणावत चालली आहे. अग, ही छिनाल टेकडी फार घातुक आहे.

**तुळशी** : पण तुम्हांला, ह्या ठिकाणीं, मी सोबत असतांना भीति कसली वाटते एवढी ?

**दौलत** : अग, काय सांगूं तुला ? ह्या ठिकाणीं चोरांचिलटांची, भुतांखेतांची, वाघलांडग्यांची नित्य वसती असते; त्यांत ही कातरवेळ आणि काळोखी रात्र, म्हणजे तर त्यांची केवळ चांदरातच ! चुटकीसरशी चटणी करून टाकतील आपणां दोघांची !

**तुळशी** : चला ! भित्रे कुठले मुलखाचे ! संभाजीमहाराजांच्या करड्या कारकीर्दीमुळं, चोरांचिलटांनीं ह्या प्रांतांतून कधींच चंबुगवाळं उचलून पोबारा केला आहे. तसंच कब्जीसारखा महामांत्रिक, राज्याचा मुख्य मंत्री बनल्यापासून महाराष्ट्रांतल्या चटसाऱ्या भुतांखेतांनीं मुक्ती घेतली आहे. राहतां राहिले वाघ आणि लांडगे——

**दौलत** : ते हरामखोर तरी डुरकाण्या फोडीत हिंडताहेत ना रात बेरात ?

**तुळशी** : पण त्यांचं भय बाळगण्याचं आपणांला मुळींच कारण नाहीं.

**दौलत** : वाघलांडग्यांचं भय बाळगण्याचं कारण नाहीं म्हणतेस ?

**तुळशी** : मुळींच नाहीं !

**दौलत** : म्हणजे ? तुळशी, वाघ—लांडगे हे प्राणी, राघूमैनेसारखे अश्राप प्राणी असतात, असं तूं समजतेस कीं काय ?

**तुळशी** : नाहीं-नाहीं, सशाकबूतरांसारखे सोज्वळ प्राणी असतात; आणि म्हणून मला त्यांचं मुळींच भय वाटत नाहीं.

**दौलत** : एखाद्या वाघानं तुला गट्ट केल्यावर किंवा लांडग्यानं काकडी-सारखी खाऊन टाकल्यावर, समजेल त्या प्राण्याचं खरं स्वरूप.

**तुळशी** : बरं, तुमच्या समजुतीप्रमाणं ते प्राणी भयंकर असले आणि ह्या ठिकाणीं येण्याची त्यांना लहर लागली, तरी तुमच्यासारखे मर्द गडी त्यांचा मुडदा पाडायला इथं आहेतच कीं !

**दौलत** : मी वाघाचा मुडदा पाडण्यापूर्वीं, वाघाच्या नुसत्या आरोळी-सरशी मी मात्र तात्काळ मुडदा होऊन जाईन. म्हणून म्हणतों, इथं फार वेळ थांबणं धोक्याचं आहे. चल जलदी.

**तुळशी** : पण तुम्ही एवढे बाके बरकंदाज मराठे गडी आणि वाघाच्या नुसत्या कल्पनेनंच भेदरून कसे जातां बाई ?

**दौलत** : अग, हा माझा दोष नाहीं, तर माझ्या आईच्या डोहाळ्यांचा हा परिणाम आहे.

**तुळशी** : काय म्हणतां, तुमच्या आईच्या डोहाळ्यांचा हा परिणाम ? तो कसा काय ?

**दौलत** : साजणी, काय सांगूं तुला ? माझ्या वेळीं माझी माय गरोदर असतांना, तिला नेहमीं वाघाचा वटारलेला डोळा आणि त्याची जंगल जागं

करणारी डरकावणी ऐकूं यायची; आणि त्यामुळं वाघ म्हटला म्हणजे माझ्या छातींत धडकीच भरते बघ. आमच्या आईला असले भिकेचे डोहाळे कुठून लागले हें आमच्या बापालाहि कळलं नाय बेटं.

**तुळशी** : प्राणपति, माझ्या आईलासुद्धां अगदीं असेच डोहाळे होत होते. मी अवघी तीन महिन्यांची असतांना आमच्या परसांत एक बिबळ्या घाव आल्याची आवई आली—

**दौलत** : अरे बापरे, बिबळ्या वाघ आला—

**तुळशी** : अहो, आतां आलेला नाहीं, माझ्या लहानपणाची हकीगत सांगतें आहें मी तुम्हांला. बरं का, परसांत वाघ आल्याचं कळतांच आईनं लगोलग पदर कसला आणि हातांत भला मोठा कोयता घेऊन त्या वाघाला तिनं एका घावासरशी कापून टाकला !

**दौलत** : परसांतला वाघ म्हणजे तुझ्या आईला जशी कांहीं परसांतली भाजीच वाटली नाहीं कां ?

**तुळशी** : अशा मर्द माउलीच्या पोटीं ही तुळशी जन्माला आली आहे. मला वाघाच्या डरकावणीचीच काय पण त्याच्या बारा हात उड्डाणाचीहि भीति वाटत नाहीं. ( वाघाची आरोळी होते ) अग बाई !

**दौलत** : अग आई ! आलाच वाटतं सैतान ! तुळशी, पळ–पळ लवकर. माझ्या आर्जवानं नाहीं पण वाघाच्या आरोळीनं तरी उठलीसच कीं नाहीं ! चल, चल, या पाउलवाटेनं आपण पळून जाऊं. पण चुडा वाजवूं नकोस आणि जोडवं टचकावूं नकोस. नाहींतर जनावर नेमकं इकडेच येईल. ( पुन्हां आरोळी )

**तुळशी** : अरे देवा ! इकडेच आला वाटतं ? आतां कुणीकडं पळायचं ?

**दौलत** : आतां अस्मानांत उडायचं ! चांडाळणी, मी मघापासून शंख करतोंय् सारखा, पण राणीच्या डौलांत बसून राहिलीस आणि त्यामुळं हा वाघ्या इथं आला. आतां तो रक्ताला चटावलेला पशू आपणां दोघांना फाडफाडून खाल्ल्याशिवाय थोडाच राहणार आहे ?

**तुळशी** : देवा रे देवा ! म्होतुरामधली तेलहळदसुद्धां धुतली नाहीं तोंच कपाळीं मरणाचा मळवट भरण्याची पाळी यावी ना माझ्यावर !

**दौलत** : बाप्पा पांडुरंगा, म्होतुरामधलं मुंडासंदेखील मीं उतरलं नाहीं अन्

इतक्यांत काळाचं कुडतं चढवण्याचा वंगाळ वखत माझ्यावर यावा ना ?

**तुळशी** : मंगळाई माते, पांचांमुखीं परमेश्वर त्याप्रमाणें त्या वाघामुखीं वैकुंठेश्वर उभा राहून आम्हां दादलाबायकोंचं रक्षण करो म्हणजे मी तुला एकवीस कोंबड्यांचा बळी देईन, ( पुन्हां आरोळी होते. )

**दौलत** : अरे बापरे ! आला वाटतं जवळ; तुळशे, तुझ्यापायीं हा प्राणावरचा प्रसंग माझ्यावर हकनाक आला. आतां मर, अवदसे ! तूंहि मर आणि मीहि मरतों. ( मेल्यासारखा पडतो. )

**तुळशी** : अहो, हें काय अवाचिन्ह ? उठा लवकर.

**दौलत** : मी मेलों आहें.

**तुळशी** : हा काय चावटपणा ! प्राणावर बेतली असतांना तुम्हांला थट्टा सुचते तरी कशी ?

**दौलत** : मी पुन्हां गर्जून सांगतों कीं, ही थट्टा नाहीं, तर मी खराखुरा मेलों आहें.

**तुळशी** : आतां काय करावं बाई ?

**दौलत** : मुकाट्यानं मरावं बाई ?

**तुळशी** : अहो, उठा लवकर. कुठंतरी पळून जाऊन आपला जीव वांचवूं आपण. ( पुन्हां आरोळी होते ) तो पहा अगदीं जवळ आला.

**दौलत** : त्याला सांग मी मेलों आहें; उगीच माझ्या वाटेला जाऊं नकोस. आणि तुळशे, तुला मी नवऱ्याच्या अधिकारानं सांगतों कीं, तुला जर जिव जगवायचा असेल तर झटकन् मरून जा. मी तर मघांच मेलों आहें.

**तुळशी** : मरा एकदांचे ! आतां मात्र कठीण वेळ आली. आतां मी काय करूं ? कुठं पळून जाऊं ! देवा, या भयाण जंगलांत, काळ्याकुट्ट अंधारांत, ह्या खवळलेल्या वाघाच्या हातून ह्या गरीब गाईचं रक्षण आतां कोण करील ? ( संभाजी आणि जोत्याजी प्रवेश करतात. )

**संभाजी** : गोब्राह्मणप्रतिपालकाचा पुत्र—हा संभाजी. बाई, माझ्या छातीची ढाल करून त्या कर वाघापासून मी तुमचं रक्षण करीन, समजलांत !

**जोत्याजी** : सरकार, जनावर जातिवंत दिसतं आहे—

**संभाजी** : जोत्याजी, जातिवंत शिकाऱ्याचं सावजहि जातिवंतच असावं लागतं.

**जोत्याजी :** पण धनी, आगाऊ दुखवल्यामुळं जनावर विलक्षण खवळल्या-सारखं दिसतं आहे; तेव्हां आपण बाजूला व्हा. राजांच्या जिवाची जोखीम-दारी चाकराच्या शिरीं आहे.

**संभाजी :** पण ह्या माउलीच्या जिवाची जोखीमदारी आमच्या माथीं आहे.

**तुळशी :** ह्या एका क्षुद्र स्त्रीसाठीं, धर्मवीर छत्रपतींनीं आपला लाखामोलाचा जीव मुळींच धोक्यांत घालूं नये.

**जोत्याजी :** आणि चाकर जिवंत असतांना धन्याच्या जीवाची जपणूक, प्रसंगीं प्राणांची सांडण करून, केल्याशिवाय हा जोत्याजी राहणार नाहीं. धनी, आपण बाजूला सरा.

**संभाजी :** किती वेडा आहेस तूं जोत्याजी ? क्रूर श्वापदाशीं सामना करण्याचा माझा कांहीं हा पहिलाच प्रसंग नाहीं ? चवताळलेली वाघीण असो किंवा खवळलेला वाघ असो, भाला किंवा तरवार न घेतां नुसत्या हातानं त्याला उभं चिरण्याचा आम्हांला बाळपणापासून सराव आहे. मग ह्या वाघाची बिशाद ती काय ?

**जोत्याजी :** आपल्या शौर्याबद्दल शंका नाहीं सरकार !

**तुळशी :** पण काळवेळ कांहीं सांगून येत नाहीं.

**संभाजी :** आणि काळाचं गणित राजालाहि सोडवतां येत नाहीं.

**जोत्याजी :** तें कांहीं नाहीं ! धनी, मी थोडी चाकराची मर्यादा सोडून महाराजांना सांगतों कीं, आपण एकीकडे व्हा. मीच ह्या वाघाला ठार करणार. आपण बाजूला व्हा.

**संभाजी :** आणि जोत्याजी, वाघाच्या पंजांत तुझीच गर्दन गवसली तर ?

**जोत्याजी :** तर मला स्वर्गसुखाचा आनंद होईल. छत्रपतींच्या जिवासाठीं चाकराचा जीव गेला तर मला जन्माचं सार्थक झालं असंच वाटेल. म्हणून म्हणतों सरकार, आपण तिथून बाजूला सरा. ह्या संकटांत उडी घेण्याचा मान हा जोत्याजी हट्टानं घेतो आहे.

**संभाजी :** जोत्याजी, कसल्याहि संकटप्रसंगीं राजाचं पाऊल रयतेच्या आधीं पडलं पाहिजे, अशी आबासाहेबांची शिकवण आहे आम्हांला. जो राजा आपल्या प्रजेला आणि एकनिष्ठ सेवकांना संकटांत लोटून स्वतः

ऐषआरामांत लोळत राहतो, तो वास्तविक खरा राजाच नाहीं; तर राजवेष चढवून सिंहासनावर बसविलेला तो उलट्या काळजाचा मांग होय. जोत्याजी, हा संभाजी खरा राजा आहे आणि म्हणून या छत्रपतींची तुला आज्ञा आहे कीं, मुकाट्यानं बाजूला हो. आम्हीच ह्या जंगलच्या राजाशीं कुस्ती खेळणार.

**जोत्याजी** : छत्रपतींची आज्ञा सेवकाला प्रमाण आहे.

**संभाजी** : आणि हें पाहा, तूं पलीकडच्या बाजूनें हाका घालून जनावर नेमकं आमच्या अंगावर येईल असं कर. जा. ( जोत्याजी जातो. )

**तुळशी** : महाराज, मी पुन्हां विनंति करतें कीं, या अभागिनीसाठीं—

**संभाजी** : मुळींच नाहीं. प्रजापालनासाठीं छत्रपतीचं कर्तव्य आम्ही करीत आहों. हें पहा आलं सावज; बाई, घाबरूं नका. ये ये दोस्ता, फार दिवसांनीं भेटलास. ( एकदम वाघ झडप घालतो. संभाजी दोन्ही हातांनीं त्याचा जबडा घट्ट दाबून धरतो. वाघ मोठमोठ्यानं आरोळ्या मारतो. ) बाई भिऊं नका. जरा डोळे उघडून स्वारीची सुरत तर बघा. ( तुळशी भीत भीत पुढं येऊन वाघाकडे पाहाते व लगेच 'अग बाई ग' अशी आरोळी मारून मागें सरते ) काय बेटा माझ्या पकडींतून सुटण्यासाठीं धडपडतो आहे ! जंगलच्या राजा, काळाच्या कचाट्यांतून तूं सुटला असशील, पण या संभाजीच्या मगरमिठींतून तुझी सुटका होणं मात्र अशक्य आहे. अरे जोत्याजी, ये–ये लवकर.

**जोत्याजी** : ( प्र. क. ) म्हणजे महाराजांच्या जिवाला कांहीं धोका....

**संभाजी** : मुळींच नाहीं. हा आमचा दोस्त मघांपासून सारखा तुला हांका मारतो आहे, म्हणून आम्ही तुला बोलावलं. क्रूर प्राण्या, जन्मभर हिंसा केलीस त्याचं प्रायश्चित्त आज हा संभाजी तुला देतो आहे. ( वाघाचा जबडा फाडून त्याला दूर फेंकून देतो )

**तुळशी** : खरा मर्द गडी आहे ! जिवाची कुरवंडी करावीशी वाटते ह्या वीर पुरुषावरून.

**संभाजी** : बाई, तुमच्या या काळाला यमलोकीं रवाना केला.

**तुळशी** : महाराज, या आपल्या उपकाराची फेड या दीन दासीकडून जन्म-जन्मांतरींहि होणार नाहीं.

**संभाजी** : पण बाई, तुम्ही कुणाच्या कोण ? तुमच्या अंगावरील हळदीवरून

तुमचं लग्न नुकतंच झालेलं दिसतं ? बाई, तुमचा नवरा कोण ?

**दौलत** : ( पुढें येऊन ) मी, मी तिचा नवरा. महाराज, हा मर्द मराठा तिचा म्होतुराचा नवरा आहे.

**संभाजी** : काय, तूं ह्या बाईचा नवरा ?

**दौलत** : होय सरकार, ही माझ्या तोंडावरची हळदच साक्ष पटवील आपल्याला कीं, ह्या मर्दाची बाईल ही तुळशी आहे.

**संभाजी** : तूं या बाईचा नवरा खात्रीनं नाहींस.

**दौलत** : सरकारच्या पायांची शपथ घेऊन सांगतों कीं, मीच तिचा नवरा आहें. हा मर्द मराठा तिचा दादला आहे.

**संभाजी** : हरामखोरा, मर्द मराठा म्हणून मिशीवर ताव मारतोस, ह्या बाईचा नवरा म्हणून छाती फुगवून सांगतोस आणि तिला एकटी वाघाच्या तोंडीं देऊन स्वतः झाडाझुडपाआड दडून बसतोस, याची तुला शरम नाहीं वाटत ?

**दौलत** : नाहीं सरकार ? मी झाडाआड दडून नव्हतों बसलों. चंद्रोदय झाला कीं नाहीं तें पहाण्यासाठीं—

**संभाजी** : अस्मानांत गेला होतास ? बेवकूफ ! नक्षत्रासारख्या बायकोला संकटांत टाकून आकाशींचा चंद्र पाहात बसला होतास ?

**दौलत** : नाहीं सरकार, त्या पलीकडच्या डोंगरमाथ्यावर गेलों होतों.

**तुळशी** : नाहीं हो महाराज, हे अगदीं धडधडीत खोटं बोलताहेत.

**जोत्याजी** : हलकटा, महाराजांसमोर खोटं बोलतोस ?

**दौलत** : पण काय ग तुळशे, तूं माझी बायको आहेस आणि मी तुझा नवरा आहें हें तरी खरं आहे ना ?

**तुळशी** : तुम्ही माझे कुंकवाचे धनी आहांत, पण माझ्या प्राणाचे धनी महाराज झाले आहेत.

**दौलत** : अरे, ही छटेल मैना या दौलतरावाच्या घरट्यांतून निसटून महाराजांच्या पिंजऱ्यांत शिरूं पहाते अं ? महाराज, आपण जसे मराठी राज्याचे मालक आहांत त्याचप्रमाणं दौलतराव या तुळशीचा मालक, धनी, नवरा आहे सरकार !

**संभाजी** : आपल्या बायकोला संकटांत टाकून जो भ्याड पळून जातो त्याला नवरेपणाचा हक्क सांगण्याचा बिलकुल अधिकार नाहीं !

**तुळशी** : अगदीं बरोबर सांगितलं महाराजांनीं. तुमचा नवरेपणा मुळींच चालणार नाहीं यापुढं !

**दौलत** : म्हणजे ! एवढ्यांतच काडीमोड करून टाकलीस ?

**संभाजी** : हरहर ! दौलतराव, तुमची ही भ्याड वृत्ति पाहिली म्हणजे अंतःकरणांत आगीचा आगडोंब पेटून जातो ! आमचा महाराष्ट्र ही मर्दांची भूमि आहे. समर्थांच्या संदेशानं आणि पुण्यश्लोक आबासाहेबांच्या आदर्शानं आजवर या भूमींत मर्दांचे पेरे करण्यांत आले आणि मर्दांचंच पीक निर्माण होत आलं ! आणि म्हणूनच आमचा जन्मजात शत्रू जो औरंगजेब त्यानं बाकीचा सारा हिंदुस्थान जिंकला, तरी त्याला मर्दांचा महाराष्ट्र कांहीं अजून आपल्या काबूंत घेतां आला नाहीं. अशा या शूराच्या भूमींत दौलतराव, तुमच्यासारखे नामर्द आणि शेळपट लोक पैदा व्हावेत हें पाहून आमच्या जिवाचा अगदीं जळफळाट होऊन जातो. नामर्द-पणा, भ्याडपणा, हे असे भयंकर दुर्गुण आहेत कीं त्यांच्यापायीं मोठमोठीं राष्ट्रें धुळीला मिळालीं आहेत.

**तुळशी** : आणि थोरामोठ्यांचे संसारहि उध्वस्त झाले आहेत.

**संभाजी** : छत्रपतींच्या महाराष्ट्रांत तरी हीं विषारी रोपं मूळ धरतां कामा नयेत. दौलतराव, तुम्ही महाराष्ट्राची हद्द सोडून या क्षणीं चालते व्हा आणि बिगरपरवाना पुन्हां तुम्ही आमच्या राज्यांत दिसलांत तर तुमचं डोकं मारण्याची सजा देण्यांत येईल हें ध्यानांत ठेवा. बाई, तुम्ही--

**तुळशी** : मी महाराजांच्या पायांची दासी--

**संभाजी** : ठीक आहे. जोत्याजी, हिला गडावर घेऊन ये आणि राणी-साहेबांच्या दिमतींत दाखल कर. ( जातो )

**जोत्याजी** : तुळशे, चल गडावर. ( जातो )

**तुळशी** : हो-हो ! चला कीं जोत्याजीराव. ( जाऊं लागते. )

**दौलत** : हो-हो ! च्यलाकी जोत्याजीराव. मोरामागं लांडोर चालली आपली. चल, फीर मागं. महाराजांना या दौलतरावाची कदर नसली तरी तुला कांहीं नवऱ्याची कदर आहे कीं नाहीं ?

**तुळशी** : तुमचा नवरेपणाचा हक्क महाराजांच्या हुकुमानं कधींच उडाला.

**दौलत** : होय, उडतोय् असा हक्क ! देवाब्राह्मणांसमक्ष माझा नवरेपणाचा शिक्कामोर्तब तुझ्यावर झाला आहे. आतां महाराजांच्या सांगण्यावरून तो

थोडाच रद्द होणार आहे ? शिवाय हें पहा तुळशी, महाराजांनीं तूं भोळसट नवतीची नार पाहून सहज गंमत केली झालं. नव्या नवरीची अशीच थट्टा करण्याची चाल आहे या मर्दांच्या महाराष्ट्रांत. तूं आपली चल घराकडे.

**जोत्याजी** : ( आंतून ) तुळशी, चल लवकर.

**दौलत** : थेरड्या, तूं एकटाच मर ना तिकडे. तुळशी, चल. चंद्रोदय झाल्यामुळं आपण आतां उड्या मारीत जाऊं घराकडं. हवी तर तुला खांद्यावर बसवून झोकांत घेऊन जातों. चल, पांखरा माझ्या—

**तुळशी** : हां ! खबरदार माझा हात धराल तर—

## पद ५ वें

**न स्पर्श हा रुचे मला मुळीं जरा । असिधारा जणुं सारा ।**
**नच रमण मज बरा । हा कठीण गमतो मजसी परी ।**
**किमपि न सुखदा, प्रमुदित मज करी ।। ध्रु० ।।**
**प्रियकर अजीं मम राजस राणा । नच तव वनिता ।**
**नृपवरकांता । बनोनि अचाचित निघालि मिरवित ।। १ ।।**

जोत्याजीरावांना हांक मारीन. जोत्याजीराव....

**दौलत** : मेला तो पटकीनं केव्हांच. ओरडूं नको अवदसे. मघाच्या वाघाच्या कर्कश आरोळीपेक्षां तुझी ही कोमल आरोळी अधिक घातुक आहे.

**तुळशी** : मिजास मर्दाची आणि नांदणूक शेळपटाची, अशी ही तुमची रीत मला मुळींच पसंत नाहीं

**दौलत** : साजणी–साजणी, हें बरं नाहीं बरं ! मी तुझ्या पायां पडतों पण मला लाथाडून तूं गडावर जाऊं नकोस. चंद्रहाराच्या आशेनं हें मंगळसूत्र गमावूं नकोस. पहा, थोडा तरी विचार कर.

**तुळशी** : चला, असल्या कुजक्या मंगळसूत्रापेक्षां तो घसघशीत चंद्रहार शतपट बरा. ( तुळशी त्याला लाथाडून जाते. दौलतराव विमनस्क स्थितींत तिच्याकडे पहात राहातो. )

**दौलत** : शेवटीं पाटाच्या बायकोनं चांगलाच पालथा पाडलान् मला ! पहा, पहा ! सटवी कशी कोंबडीसारखी झुलत चालली आहे ऐटींत ! जा–जा, कैदासणी, आज आनंदानं उड्या मारीत तूं गडावर जात आहेस; पण उद्यां ढसढसां रडत गडाखालीं उतरावं लागेल तुला. माझी बायको

पळवूनच्या पळवून महाराजांनीं वर मला हद्दपारीची शिक्षा सुनावली काय? ठीक आहे. या मर्द मराठ्याचा हिसका महाराजांना दाखविल्याशिवाय हा दौलतराव कधींहि राहणार नाहीं. ( जातो. )

---

## प्रवेश २ रा

( **स्थळ**:- तुळापूर. **औरंगजेब, गणोजी शिर्के** आणि **कब्जी** प्र. क. )

**औरंगजेब** : क्या कहते हो शिर्के, हमे संभाजी और रायगडका कब्जा बेखटका मिलेगा ?

**गणोजी** : जी हा हुजूर ! खाविंदांना माहीतच आहे कीं, त्या संभ्यानं शिरक्यांचं शिरकाण करून आमच्या घराण्यांतल्या उत्तमोत्तम वीरांचा नाहक शिरच्छेद केला आहे.

**औरंगजेब** : और हमारे मातबर सरदारोंकोभी, उस शाही कातीलने खत्म कर डाला है.

**गणोजी** : तेव्हांपासून भोसल्यांचा निर्वंश करण्याची या गणोजीनं प्रतिज्ञा केली आहे.

**औरंगजेब** : ये बेवकूब मरगठ्ठोंको और काफीर कातिलोंको, दुनियासे उखाड देनेके वास्ते, ये अलमगीर उम्रभर जिक्र करता है. मगर, काफीर मरगठ्ठोंका तखदिर शिकंदर होनेके वजहसे, आजतक मेरी हवस पूरी होनेका मौका नहीं आया !

**गणोजी** : पण खाविंद, तसा मौका आज आला आहे. रायगड हुजूरच्या चरणीं अर्पण करण्याची हमी मी देतों.

**कब्जी** : आणि रायगडचा राणा संभाजी, हुजूरच्या हवालीं करून देण्याची कामगिरी, हा छत्रपतीचा मुख्य प्रधान कब्जी शपथेवर पत्करीत आहे.

**औरंगजेब** : क्या, क्या कहते हो कब्जीबाबा ? छत्रपतीको तुम हमारे सुपूर्त करदोंगें ?

**कब्जी** : बेषक, बेषक, त्यांत एवढें अवघड किंवा अनुचित असं काय आहे ? आम्ही मूळचे बादशाही राजवटींतले रहिवाशी. अत्तर विकण्यासाठीं सहज फिरत फिरत दक्षिणेंत आलों. चंडिकेच्या कृपेनें अल्पावधींतच अमात्यपदावर

आरूढ झालों. अकस्मात् भाग्य फळफळलं आमचं ? आणि आज तर मराठ्यांच्या सिंहासनाचा मी सूत्रधारच बनलों आहे !

**गणोजी** : खरंच. कब्जीची ही चढती कमान आणि बढती दौलत खरोखरच कौतुकास्पद आहे.

**कब्जी** : खाविंद, आज संभाजी केवळ नांवाचा छत्रपति राहिला आहे; खरा छत्रपति हा कनोजीब्राह्मण—कब्जी आहे. मी करीन तो कायदा आणि बोलेन तो हुकूम अशी आमची आमदानी असल्यामुळें, संभाजीला शहनशहाच्या हवालीं करणं आम्हांला मुळींच अशक्य नाहीं !

**औरंगजेब** : ठीक ! तो शिर्के, पहिले मुझे कहो की, तुमने किस तरकीबसे रायगड हासील करनेका मनसुबा किया है ?

**गणोजी** : वाईच्या देशमुखीची लालूच दाखवून खुद्द किल्लेदार सूर्याजी पिसाळालाच मीं फितूर करून आमच्या कारस्थानांत सामील करून घेतला आहे. शिवाय, गडावरील शिबंदींतहि फितुरीचा दारूगोळा पेरून ठेवला असल्यामुळं गडाचा पाडाव हां हां म्हणतां होईल. संभाजी फिरंग्यावरील स्वारींत गुंतला आहे, ही संधि साधून आम्ही हा सारा व्यूह बेमालूम जुळवून टाकला हुजूर !

**कब्जी** : पण शिर्के, फिरंग्यावरील स्वारी फत्ते करून संभाजी आज उद्यां गडावर दाखल होईल आणि रायगडावर संभाजी जातीनें हजर असल्यावर गड फत्ते होणं मुष्कील आहे.

**गणोजी** : अहो पण कब्जी, तुम्ही संभाजीला धर्मकर्माच्या निमित्तानं किंवा स्वारीशिकारीच्या सबबीनं गडावरून खालीं आणा आणि त्याला बादशहांच्या स्वाधीन करा. संभाजी गडाबाहेर पडतांच, गडाला शह देऊन सर करतों रायगड.

**कब्जी** : शिर्के, आपला मनसुबा सर्व दृष्टीनं सोक्त आहे; पण या जिवावरच्या कामगिरीबद्दल, बादशहाकडून आम्हांला भरपूर मेहनताना किंवा मुशाहिरा मिळाल्याशिवाय, ह्या कारस्थानाची उस्तवार आपल्याकडून होणार नाहीं.

**औरंगजेब** : तुम बेफिक्रीर रहो. अगर तुम संभाजीको हमारे सुपूर्त करदोंगे, तो हम तुमको दख्खनकी सुभेदारी बहाल करेंगे।

**गणोजी** : कां कब्जी ? आतां तरी खूष तब्येत झाली तुमची ?

**कब्जी** : मुळींच नाहीं. दख्खनची सुभेदारी म्हणजे सुळावरची पोळी. शिवाय असं पहा हुजूर, आम्हीं संभाजीला तुमच्या स्वाधीन केला आणि शिर्क्यांनीं आपल्याला गडाचा ताबाहि पण मिळवून दिला; तरी मराठी राज्यासाठीं, आपल्या प्राणांचीहि तमा न बाळगणारे कांहीं शूर मराठे दक्षिणेंत जिवंत आहेत. ते मला सुभेदारीचं सुख थोडंच पचूं देणार आहेत ?

**गणोजी** : पण एकदां मराठ्यांचा राजा आणि राजधानी बादशहांचे हातीं पडल्यावर आणि रायगडावर एकदां इस्लामचा झेंडा फडकूं लागल्यावर, सगळे जिवंत मराठे सरदार बोल बोल म्हणतां मेले मुडदे बनून जातील; आणि मग तुमच्याकडे वांकडा डोळा करून पाहण्यास कोणीच धजणार नाहीं.

**कब्जी** : तें खरं शिर्के ! पण आमचा पिंड मूळ उत्तर हिंदुस्थानचा. आमच्या तीन पिढ्या मथुरेंत गेल्या, त्यामुळं दक्षिणेपेक्षां उत्तरेचाच आम्हांला अधिक जिव्हाळा वाटतो. शिवाय दक्षिणी लोकांची मला रात्रंदिवस धाकधुक वाटत असते. मोठे हिकमती आणि शूर आहेत गुलाम ! पुढंमागं डोईवर केंस राहूं देणार नाहींत माझ्या. तेव्हां दिल्लीमथुरेच्या आसमंतांत, आम्हांला वंशपरंपरा उपभोगतां येईल, अशी भरपूर असामी आम्हांला लाभावी अशी इच्छा आहे.

**औरंगजेब** : अच्छा कब्जी, मुलतानके पास बारा लाखका मुल्ूख तुम्हे बहाल किया जायगा. शिर्के, ठीक है ना ?

**गणोजी** : जी हां खाविंद.

**कब्जी** : मग हुजूर, संभाजी आपल्या स्वाधीन झालाच म्हणून समजा.

**गणोजी** : आणि खाविंद, मी रायगड आपल्या सुपूर्त केल्याबद्दल, कब्जींनीं आपल्या स्वाधीन केलेला संभाजी आपण माझ्या पदरांत टाका म्हणजे मलाहि माझं बक्षीस मिळाल्यासारखं होईल.

**औरंगजेब** : जरूर जरूर !

**गणोजी** : एकदां संभाजी हातीं पडल्यावर, त्याला मी हालहाल करून ठार करीन आणि शिरकाणाचा सूड पुरेपूर उगवून घेईन.

**कब्जी** : तर मग बारा लाखांच्या जहागिरीची सनद हुजूरांनीं माझ्या

स्वाधीन करावी; म्हणजे मी पुढील उद्योगाला लागतों.

**औरंगजेब :** कब्जी, ऐसा कभी नही होगा. पहिले संभाजीको हाजीर करो, और फिर जहागिरीकी बात बोलो. अव्वल संभाजी, आखरी सर्फराजी !

**कब्जी :** ( स्वगत ) बादशहाचे शब्दावर विश्वास कसा ठेवावा ! आमचे-कडून कामगिरी करून घेऊन, शेवटीं आमच्या तोंडाला पानं पुसून स्वारी मोकळी व्हायची !

**औरंगजेब :** ( स्वगत ) संभाजी हमारे शाही जंजीरमें फस गयेबाद, कौन पुछता है ये कनोजी कुत्तेको ?

**कब्जी :** ( हळूच ) मग कसं शिर्के ?

**गणोजी :** कसं काय ? बादशहांच्या शब्दाबद्दल तुम्हांला बेभरंवसा वाटतो ?

**कब्जी :** अहो, बापाला बाप न म्हणणारी ही स्वारी ! केव्हां उलटून पडेल त्याचा नेम नाहीं.

**गणोजी :** अहो पण कब्जी, मी आहें ना ? तुम्ही कां काळजी करतां ? तुम्हांला बारा लाखांची सनद मिळाल्याशिवाय, मी रायगड त्याचे ताब्यांतच देत नाहीं; मग तर झालं ?

**औरंगजेब** कब्जी बाबा, तुम इतनी फिक्र किस लिये करते हो ! अलम-गीरकी जबान, याने अल्लाका अलफाज समझो ?

**कब्जी :** कांहीं हरकत नाहीं. हुजूरच्या शब्दावर माझा पूर्ण विश्वास आहे. चला. म्हातारपणीं सुखानं हरी हरी करीत बसायला हक्काची जागा झाली जहागिरीची ! चला, गणोजी राजे, तुम्ही आम्ही मिळून संभाजी आणि रायगड अलमगिराच्या सुपूर्त करण्याच्या कामगिरीला लागूं या.

**गणोजी :** खाविंदांची आम्हांला जाण्याची परवानगी असावी !

**औरंगजेब :** जाव जाव ! अल्लाहुताला तुमपर रहेम करेगा. ( **कब्जी** व **गणोजी** जातात· ) कौन है, तकरीबखान—

**तकरीब० :** ( प्रवेशून ) हुजूर—

**औरंगजेब :** तकरीबखान, देखो, मरगठ्ठोंका दिवाण और सिर्के राजे, संभाजीको और रायगड किल्लेका, हमारे सुपूर्त करनेका मनसुबा करके यहांसे गये है. उनके हिफाजतके वास्ते, तुम भी अपने साथ पांच हजार फौज लेकर जाना, और हुषारीसे रहना ! कब्जी और गणोजी काफीर है. काफीरको

काफीर मिलेंगे और हमको धोका देंगे गनीम. इसवास्ते गाफील मत रहना. जाव. ( **तकरीबखान** जातो. ) ऐ खुदा ! पाक पैगंबरका बंदा ये अलमगीर कैसा बदनसीब है ? उम्रभर काफरोंका नामो निशाण मिटाकर इस्लामका चांदसितारेका झंडा, कुलमुल्कमें फैनानेका मैं दिलो जानसे जिक्र कर रहा हूं ! मगर अफसोस की बात है ! ये दख्खनमे बदमाष काफरोंनें मुझें बहोत बहोत सताया है ! विजापूर गुवलकुंडा जैसी सलतनतें, मैंने आसानीसे हासिल कर लिई. मगर ये मगरूर मरगठोंको कायल करना, मुझें बेअंदाज, मुष्कील हुआ है. कुछ साल पहिले, आग्रेके कीलेमें वो काफीर सीवाजीको कैद करके रखनेका मेरा मनसुबा था. मगर किस्मतने धोका दिया. और वो कंबख्त ऐसे चालाखीसे भाग गया की, ये आलमगीरको हजर खाकर मर जाना जरूर था ! ये संभाजी तो 'बापसे बेटा सवाई' मालूम पडता है. सिवाजी चलाखबाजीसे चलता था. और ये संभाजी तो समशेरबाजीसे चलनेवाला गाजी दिखता है. आज सात बरससे उसके साथ जंग चला है; लेकिन दख्खन बरबाद करनेका मेरा मतलब, तनिकभरभी पूरा नही होता. इसवास्ते, मैदानेजंगका सीधा रास्ता छोडकर, फरेबकी टेडी राह पकडना मुझें मुमकिन हुआ है. मगर कब्जी और गणोजी असली अवलादके होंगे, तो वे संभाजीको और रायगढ कीलेको हमारे सुपूर्त जरूर करेंगे. ( जाता )

---

## प्रवेश ३ रा

[ **स्थळ :—रायगड. तुळशी** प्रवेश करते. ]

**तुळशी :** खरंच, माझं भाग्य किती थोर आहे ? दौलतरावासारख्या नामर्दाच्या सांगातीं बेचव संसार करण्यापेक्षां, महाराजांसारख्या रणमर्दाच्या सोबतीनं, प्रेमाची रंगपंचमी खेळण्याचं भाग्य मला लाभलं आहे. महाराजांनीं मला राणीसाहेबांच्या दिमतीला दिली आहे खरी, पण ही फर्जंदाची पोर, विडे लावीत बसण्यासाठीं किंवा पंख्यानं वारा घालण्यासाठीं खास जन्माला आलेली नाहीं. माझ्या नाजूक नखऱ्यानं, भेदक नजरेनं आणि गुलगुलीत संभाषणानं, संभाजीसारख्या रंगेल राजाला भुरळ पाडून, अल्पावधींत मी

अंकितं करून टाकीन. या तुळशीच्या मादक सौंदर्यानं मोठा लढवय्यासुद्धां लगोलग लंपट बनून जाईल.

## पद ६ वें

**गुलजार मी नवबाला । झणीं फेकूनी शर डोळा ।**
**अधरीं सुधारस भरला हा ॥ धृ० ॥ करुनि आतां**
**नवरंगलीला । बहु खेळुनि प्रीतीच्या खेळा ।**
**वश खास तो करीं शंभू भोळा ॥ १ ॥**

**कब्जी** : ( प्र. क. ) अरे; सोन्याच्या पिंजऱ्यांत हें नवीन पांखरूं कोण आलं ? महाराजांनीं गोमांतकावरील स्वारीवरून येतांना, विजयश्रीबरोबरच ही सुंदर स्त्रीसुद्धां आणल्यासारखी दिसते. कोण बाई आपण ?

**तुळशी** : कोण बुवा आपण ?

**कब्जी** : मी ह्या राज्याचा मुख्य प्रधान आहें.

**तुळशी** : मी ह्या राज्याची महाराणी आहे.

**कब्जी** : अरेच्या ! अगदीं बेकदर उत्तर देते. उर्मट पोरी, तूं कोण आहेस याचा सरळ जबाब दे; नाहींतर महाराजांना सांगून तुला हत्तीच्या पायीं देऊन ठार करून टाकीन.

**तुळशी** : हत्तीच्या पायीं ? हत्तीच्या ! त्यापेक्षां महाराजांच्या पायीं द्याल तर फार छान होईल. द्याल ना मला महाराजांच्या पायीं ?

**कब्जी** : या कब्जीची करडी कारकीर्द तुला माहीत नाहीं !

**तुळशी** : अगबाई ! तुम्ही का कब्जी ? तुमची कीर्ति माझ्या कानीं आली आहे आणि ह्या तुमच्या केंसांवरून करडी कारकीर्द कळली मला.

**कब्जी** : चांगले कोरडे पाठीवर बसल्याशिवाय या कब्जीचा प्रभाव आणि दरारा--

**तुळशी** : पुरे, पुरे, पुरे ! माझ्यासारख्या तरण्याताठ्या पोरीवर तुमचा प्रभाव मुळींच पडणार नाहीं.

**कब्जी** : ( स्वगत ) पण या पोरीचा मात्र माझ्यावर पुरा प्रभाव पडला आहे.

**तुळशी** : हो, बरी आठवण झाली. काय हो कब्जीबाबा--

**कब्जी :** चूप. तरुण पोरींनीं मला बाबा म्हटलेलं बिलकुल खपत नाहीं. हां, एखाद्या ऐंशीं वर्षांच्या अम्मानं तसं म्हटलं तर एकवेळ चालेल; कारण जख्खड थेरडीनं बाबा म्हटलं काय किंवा लेका म्हटलं काय त्यापासून तादृश फायदा पूज्य !

**तुळशी :** पण काय हो कब्जी, तुमच्याजवळचीं अत्तरं संपलीं कां ? मला महाराजांसाठीं शृंगारशेज करायची आहे आणि त्याच्यावर शिंपडण्यासाठीं उंची अत्तरांची जरूर आहे. तुम्ही अत्तरं विकतां म्हणून मी ऐकलं आहे. तेव्हां चांगल्यापैकीं पानडी किंवा चमेली असली तर द्या शेरभर !

**कब्जी :** पोरी, पुरे कर हा पाचकळपणा. विक्रीसाठीं माझ्याजवळ आतां थेंबभरहि अत्तर शिल्लक नाहीं.

**तुळशी :** म्हणजे, आतां तो धंदा तुम्ही बंद केलात वाटतं ?

**कब्जी :** ( स्व. ) अलीकडे आम्हीं अत्तरांचे बुधले ठेवणं बंद केलं असून, तुझ्यासारख्या रिकाम्या अत्तरदाण्या जवळ बाळगण्याचा क्रम सुरू केला आहे. ( उ. ) पण काय ग, ही कलाकुसरी कोणत्या गांवची ?

**तुळशी :** मी फर्जदाची पोर तुळशी आहें. संभाजी महाराजांची--

**कब्जी :** रखेली आहेस !

**तुळशी :** नव्हे-नव्हे, राणी होणार आहें. या तुळशीचें महाराजांशीं लग्न लागणार आहे.

**कब्जी :** पण या कनोजी ब्राह्मणाशिवाय हें तुळशीचें लग्न लागणार नाहीं. कारण संभाजी केवळ लंगडा बाळकृष्ण आहें. आज हा कब्जी म्हणेल ती पूर्व आणि करील तो कायदा असा इथला रुबाब आहे. माझ्या आज्ञेशिवाय ह्या राज्यांत घोड्यावर खोजीर चढणार नाहीं किंवा बायकोला बाशिंग लागणार नाहीं. म्हणून म्हणतों तुळशे, या मांत्रिकाच्या तंत्रानें चालशील तरच तुझ्या सर्व इच्छा पूर्ण होतील. हां हां म्हणतां पट्टराणी होऊन जाशील.

**तुळशी :** तीच तर या तुळशीच्या जिवाभावाची मनीषा आहे !

**कब्जी :** आणि तुझी मनीषा पूर्ण होईल असा या कनोजी ब्राह्मणाचा तुला कळकळीचा आशीर्वाद आहे. मी आतां जातों आणि संभाजीला इकडे पाठवून देतों. तुझ्या मोहिनी अस्त्राचा अनिवार मारा करून त्याला चांगला काबूंत आण; म्हणजे माझं कारस्थान फळाला येईल आणि तुझ्या पायांत

सोन्याच्या साखळ्या पडून ही रानतुळस एकदम रायगडची राणी बनेल.

**तुळशी** : अहाहा ! कब्जी, तुमच्या तोंडांत मथुरेचा पेढा पडो !

**कब्जी** : टीक आहे. मी जाऊन संभाजीला इकडेच पाठवून देतों. मात्र हुषारीनं वाग. त्याचं तानमान पाहून व लहर अजमावूनच तुझ्या मोहिनी विद्येचा प्रयोग सुरू कर. नाहींतर सावज बिथरून जाईल आणि या तुळशीच्या मंजिऱ्या खुडून तिला भुंडी करून टाकील. सावध ऐस, सुकुमार तरुणी आणि लज्जतदार वारुणी यांचा दुहेरी मारा केल्यावर, संभाजीसारखा मर्द गडीहि मऊ मेण बनून जाईल; आणि मग त्या मेणाला मन मानेल तसा आकार देणं मुळींच अवघड नाहीं. ( जातो )

**तुळशी** : मोठ्या मंगल मुहूर्तावर मी इथं आलें असंच म्हटलं पाहिजे. मराठी राज्याचा हा दिवाण मी नुसत्या नेत्रकटाक्षानं निमिषांत वश केला. माझ्या मंगळाईनं उत्तमच कौल दिला. तेव्हां आतां तो रायगडचा राणा माझ्या प्रेमाच्या जादूनं माझ्या मुठींत येणं मुळींच अशक्य नाहीं. सुंदर आणि तरुण स्त्रीनं नुसता पदर चाळवला किंवा किंचित् डोळा लववला तरी मोठा तपोनिष्ठ आणि खंदा लढवय्या पुरुषहि लाळ घोटूं लागतो. आतां महाराज इथं आल्यावर त्यांच्याशीं कोणकोणत्या कामचेष्टा करावयाच्या बरं ? हं ! अगोदर पाठ फिरवून उभं राहायचं, मग हळूच मान वळवून त्यांच्याकडे पाहायचं आणि एक नाजूक नयनबाण फेंकायचा. आणि मग स्वारी आसनावर येऊन बसली म्हणजे जवळ जाऊन मंजूळ आवाजानं ‘ सख्या ’ अशी साद घालायची आणि त्याच्या गळ्यांत कोमल करपाश टाकून त्यांच्या मांडीवर बसायचं. हो, अगदीं असंच करायचं ! त्या मेल्या दौलतरावाच्या संसारांत असे दिलखुष रंग मला मुळींच खेळायला मिळते ना.

## पद ७ वें

**दावोनि प्रेमलीला । जिंकीन मी नृपाला ।। ध्रु० ।।**
**पसरोनि प्रेमजाला । भुलवीन राजसाला ।।**
**शृंगार नवा केला ।। १ ।।**
**भिडतांचि नेत्र नेत्रां । करपाश कंठिं पडतां ।।**
**घायाळ करिन त्याला ।। २ ।।**

आतां कामदेवाचे पांची बाण सोडून मी संभाजीला खात्रीनं जिंकणार !

( **संभाजी** येतो )

**संभाजी** : संभाजीला जिंकण्याचा आमच्या दुष्मनांनीं आटोकाट प्रयत्न चालवला आहे; पण शिवप्रभूचा पुत्र हा संभाजी अजिंक्य आहे हें त्या दुष्ट खलांना कुठं माहीत आहे ? फिरंग्यांना जरब बसवली तर आतां हबसाण हालचाल करूं लागला आहे. मुंबईचा जलचर मराठी राज्याचे लचके तोडण्यासाठीं धडपडतो आहे आणि विजापूर गोवळकोंडा घशांत टाकून पुष्ट बनलेला आमचा जन्मजात वैरी औरंगजेब तर मराठेशाही बुडवण्यासाठीं आज जातीनं दक्षिणेंत तळ देऊन बसला आहे; अशा चौफेर चक्रव्यूहांत आज दख्खन दौलत सांपडली आहे आणि त्यामुळं सदैव जागरूक राहून, खूब शर्तीनं लढून, हिंदवी स्वराज्याची रखवाली आम्हांला केली पाहिजे.

**तुळशी** : छे बाई ! पदराचा चाळा फुकट गेला ! नजरेची फेंक निष्फळ ठरली. ( ' भिडतांचि नेत्र नेत्रां ' हा चरण गुणगुणते. )

**संभाजी** : कोण, तुळशी ? तुला इथं गोड लागत नसेल ? दौलतरावाच्या आठवणीनं तुला चैन पडत नसेल ? पण आमचा त्याला नाइलाज आहे. आमच्या महाराष्ट्रांत नामर्द भागुबाईंनीं राहतां कामा नये असा आमचा दंडकच आहे. छातीठोकपणानं दुष्मनावर तुटून पडायला जो तत्पर असेल त्यालाच महाराष्ट्रांत राहण्याचा हक्क आहे आणि असल्या निधड्या वीरांचीच आमच्या देशाला सांप्रत जरूर आहे. तेव्हां तुळशी, दौलतरावाच्या शिक्षेबद्दल—

**तुळशी** : सरकार, त्यांच्याबद्दल मला तिळमात्र वाईट वाटत नाहीं; उलट महाराजांच्या सहवासांत दासीला भारी भारी सुख होत आहे.

**संभाजी** : बरं तुळशी, तूं आंत जाऊन राणीसाहेबांना आम्हीं इकडे बोलावलं आहे म्हणून कळीव जा.

**तुळशी** : धनी, सरकारस्वारीला लढाईत निरंतर यश मिळावं म्हणून राणीसाहेबांनीं शिवरात्रीव्रत घेतलं आहे. व्रताचं उद्यापन झाल्याशिवाय त्यांना आसनावरून उठतां येणार नाहीं.

**संभाजी** : ठीक आहे. त्यांच्या व्रतवैकल्यांत आम्ही विक्षेप करूं इच्छित नाहीं. तूं जाऊन त्यांच्या दिमतीला राहा.

**तुळशी** : पण सरकार, आपल्या सेवेसाठीं खुद्द राणीसाहेबांनींच या गरीब दासीला इकडे धाडली आहे. महाराजांनीं या ठिकाणीं थोडा वेळ सुखानं विश्रांति घ्यावी.

**संभाजी** : सुखानं विश्रांति घ्यावी ? या संभाजीला गेल्या नऊ वर्षांत क्षणाचीहि विश्रांति लाभलेली नाहीं. आबासाहेबांच्या कैलासवासानंतर, राजसिंहासनासाठीं आप्तेष्टांशीं झगडण्यांतच आरंभींचा काळ घालवावा लागला आणि नंतरची उरली उमर धर्मभ्रष्ट दुष्मनांची रग जिरवण्यांत वेंचावी लागली आम्हांला.

**तुळशी** : आणि म्हणूनच महाराज, आपल्याला तर विश्रांतीची जरूर अधिक आहे.

**संभाजी** : पण कार्यकर्त्या पुरुषानं कार्याच्या फलश्रुतीपर्यंत सर्व प्रकारच्या विश्रांतीला आणि सुखोपभोगाला फांटा दिला पाहिजे.

**तुळशी** : पण सरकार, आपल्या कार्याची फलश्रुती पूर्णपणें झाली आहे असं माझ्या अल्पबुद्धीला वाटतं. महाराजांचा दरारा सर्व शत्रूंना चांगला बसला असून, छत्रपतींच्या कीर्तीचा सूर्य सर्वत्र तळपूं लागला आहे.

**संभाजी** : पण अलमगिराचं ग्रहण अजून कुठं सुटलं आहे ?

**तुळशी** : कब्जीसारखा कनोजी ब्राह्मण 'दे दान सुटे गिराण' म्हणून गर्जत असतांना, महाराजांना अलमगिरीच्या ग्रहणाची चिंता करण्याचें मुळींच कारण नाहीं. म्हणून म्हणतें, महाराजांनीं आतां निघोर विश्रांति घ्यावी व ह्या गरीब दासीची सेवा गोड मानून घ्यावी. ( पाय चेपूं लागते )

**संभाजी** : राणीसाहेबांशिवाय, दुसऱ्या कोणत्याहि स्त्रीची सेवा आम्हांला मंजूर नाहीं.

**तुळशी** : मग धनी, राणीसाहेबांचं उद्यापन होईपर्यंत मलाच जर आपण राणीपदावर बसवलीत...

**संभाजी** : चूप रहा. पुन्हां तसली बात बोलशील तर जीभ छाटून टाकीन.

**तुळशी** : क्षमा असावी महाराज ! हुजुरांच्या डोक्याला फार शीण झाल्यासारखा दिसतो. मी डोकं चेपतें हलक्या हातांनीं. ( डोकें चेपूं लागते )

**संभाजी** : चल, दूर हो. या हलक्या लोकांशीं जरा सहानुभूतीनं वागलं कीं, हीं मालकाच्या पायपोसापासून उठून डोक्याशीं जाऊन भिडतात एकदम.

**तुळशी** : सरकार, कसूर माफ. आपली सेवा हातून घडावी, महाराजांचा शीणभार हलका करण्यासाठीं मंजूळ गाणीं गावीं आणि या दीन दासीला महाराजांच्या हृदयमंदिरांत जागा मिळावी या भाबड्या आशेनं—

**संभाजी** : म्हणजे, काय म्हणतेस तुळशी ? तुझं प्रेम माझ्यावर बसलं असून मी तुझ्याबरोबर लग्न करावं ?.

**तुळशी** : आणि या दीन दासीला धन्य करावी.

**संभाजी** : पण राजाच्या गळ्यांत रत्नमाला शोभते, कवड्यांची माळ शोभत नाहीं. तुळशी, मी तुला निक्षून सांगतों कीं, एकट्या राणीसाहेबां-शिवाय बाकीच्या सर्व स्त्रिया मला मातेसमान आहेत.

**तुळशी** : ( स्व. ) हर–हर ! माझी कल्पना अगदींच चुकली. कृष्ण समजून मीं कामचेष्टा केल्या पण हा राम निघाला मेला.

**संभाजी** : मातोश्री, आपण आतां राणीसाहेबांकडे जा.

**तुळशी** : ( रडत ) महाराज, केवढा हिरमोड केलांत माझा ! माझे सगळे आशेचे मनोरे ढांसळून टाकलेत. प्रेमभंगासारखं स्त्रियांना दुसरं तीव्र दु:ख नसतं. महाराज, अशा रीतीनें माझ्या जिव्हारीं घाव घालण्यासाठींच का त्या दिवशीं त्या वाघाच्या जबड्यांतून मला वांचवलीत ?

**संभाजी** : मुळींच नाहीं. माझ्या कर्तव्यासाठीं त्या क्रूर वाघापासून मी तुला सोडवली.

**तुळशी** : मग आतां मला दूर कां बरं लोटतां ? प्रजेला राजानंच दूर लोटल्यावर तिनं कोणाच्या आश्रयाला जायचं ? माझ्या नवऱ्याला तुम्ही दूर लोटलंत. पण आपण मला जवळ कराल या आशेवर मीं तें दु:ख मुका-ट्यानं गिळलं आजवर.

**संभाजी** : तुळशी, मायावी स्त्रीजातीच्या कांगाव्यानं या छत्रपतीचं मन रतिमात्रहि चळणार नाहीं, समजलीस ?

**तुळशी** : तुमच्या या कठोरपणापेक्षां तो बिचारा क्रूर वाघच बरा असं मला वाटूं लागलं आहे.

**संभाजी** : मग त्या बिचाऱ्याकडे तुला पुन्हां जायचं आहे का ? अरे, कोण आहे रे तिकडे ? ( जोत्याजी येतो ) या तुळशीला सह्याद्रीच्या जंगलांतल्या क्रूर वाघाच्या जबड्यांत सोडून ये.

**तुळशी** : नाहीं—नाहीं महाराज, मला त्या दिवशींच्या त्याच वाघाच्या जबड्यांत सोडलं पाहिजे तुम्हीं.

**संभाजी** : जोत्याजी, जा हिला घेऊन आणि एखाद्या खवळलेल्या वाघाच्यापुढं या स्त्रीला टाकून परत ये. (**राजकुंवर** येते. जोत्याजी जातो.)

**राजकुंवर** : दादा, दादा, कोणत्या स्त्रीला वाघाच्या पुढं टाकायला सांगतोस ?

**संभाजी** : कोण कुंवर ? फार दिवसांनीं भेटलीस ग. बैस बैस.

**राजकुंवर** : पण दादा, कोणत्या स्त्रीला वाघाकडून मारवतो आहेस ? आणि या कोण ?

**संभाजी** : ही फर्जंदाची मुलगी तुळशी. हिला त्या दिवशीं मी क्रूर वाघापासून वांचवली——

**तुळशी** : आणि ताईसाहेब, आज तेच महाराज मला वाघाच्या तोंडीं देताहेत हें चांगलं कांहो ? तुम्हीच सांगा ? जीवदान देणाऱ्यानंच जीव घ्यावयाचा ? हा खासा न्याय !

**संभाजी** : काय विचित्र बाई आहे ?

**तुळशी** : ताईसाहेब, महाराजांनीं माझ्या म्होतुराच्या दादल्याला हांकलून दिला आणि मला वाघाच्या तोंडीं देताहेत, हें रास्त आहे का ?

**राजकुंवर** : म्हणजे ! दौलतरावाची पाटाची बायको तुळशी——

**तुळशी** : होय ताईसाहेब, तीच मी. (नमस्कार करते)

**राजकुंवर** : दादा, दौलतरावाबाबत मी तुला जाब विचारणार आहें.

**संभाजी** : खुशाल विचार !

**राजकुंवर** : दौलतरावाला तूं हद्दपारीची शिक्षा फर्मावलीस ती काय म्हणून ?

**संभाजी** : तो भ्याड, छत्रपतींच्या राज्यांत राहायला लायक नव्हता म्हणून.

**राजकुंवर** : पण त्याची अशी कोणती नालायकीची वागणूक दिसून आली तुला ?

**संभाजी** : वाघाच्या आरोळीसरशी आपल्या बायकोला जंगलांत एकटी टाकून तो पळून गेला.

**तुळशी** : पळून गेला नाहीं. सरकार, मरून पडला. पळण्याची शक्ति त्याच्या पायांत होतीच कुठं मुळीं ?

**संभाजी** : मग असला माणूस महाराष्ट्रांत राहायला लायक आहे कां ? नाहीं ना ? म्हणूनच मीं त्याला हद्दपारीची शिक्षा फर्माविली.

**राजकुंवर** : पण दादा, त्यामुळं ते वैतागून औरंगजेबाकडे—

**संभाजी** : गेला ना ? मग तो नादान मनुष्य आमच्या राज्यांत राहायला खरोखरच पात्र नव्हता.

**तुळशी** : ते मोंगलांना जाऊन मिळाले ना ? बाई–बाई–बाई ! माझा दादला अगदींच बहकला.

**राजकुंवर** : ऐकून तर घे. ते मोगलांच्या आश्रयाला जात होते पण मी त्याला थोपवून धरलें.

**तुळशी** : अहाहा ! ताईसाहेब, माझी मंगळाई तुम्हांला मार्कंडेयाचं आयुष्य आणि मोप मुलं देईल बघा.

**संभाजी** : पण कुंवर, छत्रपतीचा हुकूम तूं कां फिरवलास ?

**राजकुंवर** : कां म्हणजे ? माझ्या भावाच्या हातून जर एखादा अविचार घडत असेल तर या बहिणीनं भावाची बाजू राखायला नको वाटतं ?

**संभाजी** : पण एक दौलतराव गेला असता मोंगलांकडे तर मराठेशाहीची इमारत थोडीच कोसळून पडणार होती ? तारा तुटला म्हणून अस्मान कांहीं भूमीवर येत नाहीं !

**राजकुंवर** : दादा, एकटे दौलतराव शत्रूला जाऊन मिळाले तर मराठेशाहीची इमारत कोसळून पडणार नाहीं, हें तुझं म्हणणं मलाहि मान्य आहे. पण मी व्यक्तीच्या दृष्टीनं बोलत नाहीं तर तत्त्वाच्या दृष्टीनं बोलत आहें. आज दौलतराव शत्रूला जाऊन मिळाले, उद्यां जाधवराव मोंगलांच्या गोटांत शिरले, परवां संताजीरावांनीं अलमगिराचा आश्रय पत्करला असा प्रकार निरंतर होऊं लागला तर शत्रूची संख्या फुगत जाईल आणि आपलं मनुष्यबळ घटत जाईल. मराठेशाहीचा तोल सांवरणारे तालेवार सरदार आधींच आम्हांला सोडून अलमगीराला जाऊन मिळाले आहेत. त्यांना परत आपल्याकडे आणायचं दूरच राहिलं; पण उलट आणखी आमच्याच लोकांना आम्ही आपल्या हातांनीं दुष्मनाच्या दारीं लोटूं लागलों, तर स्वराज्याची इमारत किती दिवस तग धरील बरं ?

**संभाजी** : अहाहा कुंवर, थोर मुत्सद्यासारखा लोकहिताचा आणि राज्याच्या

कल्याणाचा सल्ला दिलास बघ ! आबासाहेबांची लेक शोभतसे खरी.

**राजकुंवर** : आबासाहेबांनीं आणि जिजाबाईनीं बजाजी निंबाळकर मुसलमान झाले असतांना, त्यांना शुद्ध करून पुन्हां आपल्या धर्मात घेतलं, यांत त्यांची केवढी दूरदृष्टि आणि राजकीय धोरण होतं सांग पाहूं. म्हणून दौलतरावांना मी माझ्या हमीवर थोपवून धरलं आणि एका महत्त्वाच्या कामगिरीवर त्यांची नेमणूकसुद्धां करून टाकली. आतां छत्रपतींचा हुकूम तोडल्याबद्दल मला जें शासन करायचं तें खुशाल कर.

**संभाजी** : कुंवर, तुला शासन म्हणजे एकच आणि तें हें कीं तुला दोषमुक्त करून सोडून देणं.

**तुळशी** : पण ताईसाहेब, आमची ती स्वारी कुठं आहे हो सध्यां ?

**राजकुंवर** : सांगेन हो लवकरच. पण दादा, आमची वहिनी कुठं आहे ?

**संभाजी** : ती व्रतवैकल्यें करीत बसली आहे. तुळशी, कुंवरला राणीसाहेबांकडे घेऊन जा. ( **तुळशी** व **राजकुंवर** जाऊं लागतात. इतक्यांतच **कब्जी** येतो. )

**कब्जी** : हुजूर, रायगड जिंकण्यासाठीं गणोजी शिर्के पांच हजार मोंगल फौजेसह निघाला असल्याची ताजी खबर आमच्या गुप्त हेरानं नुकतीच आणली आहे.

**संभाजी** : मोंगलांच्या मदतीनं गणोजी रायगड जिंकण्यासाठीं येतो आहे ? शिरक्यांच्या शिरकाणांतून शीरसलामत राहिलेला गणोजी संभाजीच्या समशेरीला बळी पडण्यासाठीं येत आहे ? वाहवा ? परम भाग्याची गोष्ट आहे. कब्जी, पिसाळांना किल्ला झुंजाविण्याची तयारी करण्याची आमची आज्ञा कळवा आणि गडावरील शिबंदीला सज्ज व्हायला सांगा. आम्ही हबसाणावर मोहीम करण्याच्या विचारांत होतों, पण आतां अगोदर शिर्क्यांचं शिरकाण.

**राजकुंवर** : दादा—दादा, माझं तुझ्यापाशीं एक मागणं आहे.

**संभाजी** : गणोजी शिर्क्यांचं शीर कापून परत आल्यावर मी तुझं मागणं जरूर पुरवीन.

**राजकुंवर** : पण दादा, तुझ्यापाशीं माझी विनंति आहे कीं, आजचा दिवस तरी थांब.

**संभाजी :** आणि उद्यां शत्रू घरांत घुसल्यावर मग युद्धाची मात्रा उगाळीत बसूं ? नाहीं. कुंवर, मी या बाबतींत तुझी रदबदली मुळींच ऐकणार नाहीं.

**राजकुंवर :** दादा—दादा, नको रे असा निष्ठुर होऊं. मी स्वतः एकदां त्यांची भेट घेऊन त्यांचं मन वळवण्याचा यत्न करून पाहाणार.

**संभाजी :** कुंवर, वैऱ्यांच्या अन्नानं माणुसकीला मुकलेला गणोजी तुझ्या विनवणीला तिळमात्रहि जुमानणार नाहीं.

**राजकुंवर :** पण माझी मनोदेवता मला ग्वाही देत आहे कीं, माझा यत्न वायां जाणार नाहीं म्हणून. म्हणून म्हणतें दादा, माझ्यासाठीं तरी आजचा दिवस स्वारीवर जाण्याचा बेत रहित कर.

**कब्जी :** हुजूर, ताईसाहेबांना आशा वाटते आहे गणोजीबद्दल, तर होईना का त्यांच्या मनासारखं ? एक दिवस थांबल्यानं राज्याची कांहीं उलथापालथ होत नाहीं. विनाकारण ताईसाहेबांना रंजीस कां करतां ? ( स्वगत ) एक दिवसाची सवड मिळाली तर आमचं अलमगीराकडचं कारस्थान हमखास तडीस जाईल.

**संभाजी :** ठीक आहे. कुंवर, तुझ्या इच्छेप्रमाणें होऊं दे. पहा यत्न करून. ( जातो. )

**कब्जी :** श्रीचंडिकेची कृपा ! ( जातो. )

**राजकुंवर :** माझ्या या कार्यांत माझी मायभवानी मला खात्रीनें यश देईल.

### पद ८ वें

**सुयश देई मला, माता भवानी**
**तव वरदकर राहो शिरिं सदा ॥ ध्रु० ॥**
**सत्य संकल्पा मी मनिं धरीं ।**
**पुरवी हेतु आतां विनवी तुला ॥ १ ॥**

( पडदा पडतो. )

---

## प्रवेश ४ था

[ **स्थळः— रायगड. दौलती** प्रवेश करतो. ]

**दौलत :** याला म्हणतात मर्द मराठा ! महाराजांनीं हद्दपार केला तरी पुन्हां

आपला सह्याद्रीच्या दगडाप्रमाणं जागच्या जागीं कायम ! पाटाच्या बायकोचं आमचं प्यादं गिळून, वर हद्दपारीनं आमची हुचमल्ली करण्याचा महाराजांचा डाव होता. पण या मर्दानं ताईसाहेबांचा हत्ती मध्यें घातला आणि राजांची बुर्जी करून टाकली ! याला म्हणतात मर्द मराठा. बाकी तुळशीच्या करणीचं मला राहून राहून आश्चर्य वाटतं. माझी बाईल बनून, माझा हात धरून आली काय आणि लगेच लाथा झाडून गेली काय ? जिवाचा नुसता हुळहुळा होऊन जातो ! खरोखर, पाटाची बायको म्हणजे न्हाव्याचा वस्तरा केवळ. वस्तरा जसा डोचकं भादरायला आणि गळा कापायला दुहेरी उपयोगी पडतो, त्याप्रमाणं पाटाची बायको तळपायाला तूप चोळायला आणि टाळूवर टप्पू मारायला सारखीच तत्पर असते. मला वाटतं, माझी बायको पळवण्याचं कारस्थान महाराज, तुळशी आणि तो वाघ्या, या त्रिवर्गांनीं आमच्या लग्नापूर्वीच केलं असावं. नाहींतर नेहमीं हरणीसारखी उड्या मारणारी तुळशी, या छिनाल टेकडीजवळ येतांच म्हशीसारखी फतकल मारून कशी बसली ? तो हरामखोर वाघ्या इतर सावजं सोडून तुळशीसारख्या साजूक सावजाच्या वासानं, नेमका त्या तिथं कसा आला ? आणि महाराज तरी वाट चुकून त्या ठिकाणीं आणि त्याच वेळीं दत्त म्हणून कसे दाखल झाले ! अर्थात पूर्वसंकेताप्रमाणंच हा सर्व बनाव घडून आला हा आमचा तर्क अगदीं तंतोतंत खरा आहे, पण आतां पुढें वाट काय ? ताईसाहेबांनीं माफीची हमी देऊन, कब्जीच्या कारस्थानाचा भेद घेण्याच्या कामगिरीवर आमची नेमणूक केली खरी. पण पाटाच्या बायकोनं जखमी केलेला हा मर्द, हीं धोक्याची कामगिरी कशी काय पार पाडणार हें पंढरीचा पांडुरंगच जाणें ! ( आंत पाहून ) हा पाहा कब्जीच इकडे येतांना दिसतो आहे. आतांच कारस्थानाचा कस घ्यायला सुरुवात करतों. तुरतदान महापुण्य ! ( हातांत लखोटा घेऊन कब्जी प्रवेश करतो, )

**कब्जी** : जगदंब, जगदंब ! राजकुंवर गणोजीकडे निघून गेली ही फार नामी गोष्ट झाली. आतां संभाजीला गडाबाहेर काढणं मला सोईचं पडेल. तिकडे राजकुंवरच्या मुठींत गणोजी गवसो किंवा तिला तो दूर झिडकारो, आमच्या फितुरीच्या कारस्थानाला त्यापासून बिलकुल धोका पोंचणार नाहीं. आत एकदां जलदी करून संभाजीला गडाखालीं नेला आणि अलमगीराच्या पद-

रांत त्याला टाकला कीं, अस्मादिक बारा लाखाचा बादशहा बनलाच म्हणून समजा.

**दौलत** : ( स्वगत ) पक्का खवळनाथ आहे बेटा—

**कब्जी** : संभाजी धर्मभोळा असल्यामुळं आणि माझ्या मंत्रप्रभावानं तो भारला गेला असल्यामुळं, माझ्या कारस्थानाच्या जाळ्यांत तो भोळा शंभू हूं कीं चूं न करतां अडकणार यांत शंका नाहीं. "रायगडावरून संभाजीला उचलबांगडी करून मी त्याला संगमेश्वरीं घेऊन येतों, तिथं तुम्ही फौजेसह येऊन आपलं सावज ताब्यांत घ्या" असा तकरीबखानाला मी हा जरूरीचा खलिता लिहिला असून त्याच्याकडे हा त्वरित रवाना केला पाहिजे.

**दौलत** : ( स्वगत ) आतां महाराजांसंबंधीं खारट तुरट बोलून स्वारीच्या पोटांत शिरलं पाहिजे.

**कब्जी** : पण हा जरूरीचा खलिता मोंगलांकडे पोंचविण्यासाठीं एखादा भरंवशाचा मनुष्य कोण हेरावा बरं ?

**दौलत** : पण असा अन्याय महाराज झाले तरी त्यांनीं काय म्हणून करावा ? आणि कब्जीसारख्या दौलतीच्या दिवाणांनीं, डोळ्यावर कातडं ओढून स्वस्थ तरी कां बसावं ?

**कब्जी** : आं ? हें काय प्रकरण आहे ?

**दौलत** : आम्ही रयत म्हणजे आम्हांला अब्रू, मान, माणुसकी कांहींच नाहीं वाटतं ?

**कब्जी** : काय रे, तूं कोण आहेस ! तुझी काय तक्रार आहे ?

**दौलत** : महाराज बहकले म्हणून दिवाणहि दिवाणे बनावे हें आश्चर्य आहे.

**कब्जी** : अरे, तुझी फिर्याद काय आहे !

**दौलत** : मराठ्यांचा कारभारी तो कब्जी ! मला प्रत्यक्ष भेटायला हवा. त्याच्या तोंडावर, पांचदहा शिव्या हांसडल्याशिवाय हा मर्द मराठा राहाणार नाहीं.

**कब्जी** : अरे मर्द मराठ्या, मीच बरं तो मुख्य प्रधान—कब्जी.

**दौलत** : आं ? खरं कीं काय ? अहाहा ! देवा, बरे भेटलांत ! आपल्याच भेटीसाठीं मी रात्रंदिन तळमळत होतों हो. देवा, आपल्याच पायाची जोड या दीनाला द्याल ना ? ( पाय धरतो )

**कब्जी** : तोंडावर शिव्या हांसडणारा हा मर्द मराठा क्षणांत पाय चाटूं

लागला. हा माझ्या मंत्राचा प्रभाव आहे.

**दौलत** : ( स्वगत ) नव्हे; हा ह्या मर्द मराठ्याचा कावा आहे.

**कब्जी** : बरं ऊठ. पण काय रे, तूं कोणत्या अन्यायाच्या आगटींत होरपळतो आहेस ?

**दौलत** : काय सांगूं देवा, शरम वाटते जीवा—

**कब्जी** : पण मर्द मराठ्यानं कधींहि शरमिंदं होतां कामा नये.

**दौलत** : देवा, धीर आला जिवाला. ही पहा शरम सोडून दिली. आतां बेशरमपणानं, माझं समग्र दुःख कारभाऱ्यांच्या कानांच्या वेशीवर टांगतों. ऐका धनी, माझी पाटाची बायको माझ्या डोळ्यांदेखत नेली.

**कब्जी** : काय, तुझी बायको पळवून नेली ? पण हा अधमपणा करणारा हिंदु होता का यवन होता ?

**दौलत** : अस्सल हिंदू हो. रायगडचं बडं धेंड होतं !

**कब्जी** : मग महाराजांच्या कानांवर ही गोष्ट घातलीस का ?

**दौलत** : पण त्यांच्या डोळ्यांसमोर घडलेली, त्यांच्याच हातची गोष्ट, पुन्हां त्यांच्याच कानावर घालणं, म्हणजे ज्याचं मुंडासं त्याच्या डोईवर ठेवण्यासारखं निरर्थक आहे.

**कब्जी** : म्हणजे ? तुझ्या बोलण्याचा नीटसा उलगडा झाला नाहीं मला.

**दौलत** : देवा, कां असं वेड पांघरतां ? आपण दख्खन दौलतीचे दिवाण. आपली अक्कल तर घोड्यापुढं धांवली पाहिजे; आणि गा म्हणतांच गाढव आहे हें आपण हेरलं पाहिजे.

**कब्जी** : हेरलं; बरोबर हेरलं आम्हीं.

**दौलत** : काय हेरलं धन्यांनीं ?

**कब्जी** : माझ्या शेजारीं दोन पायांचा गाढव उभा आहे हें.

**दौलत** : ( स्वगत ) आणि माझ्या शेजारींहि त्याच जातीचा पशू आहे हें आम्हींहि हेरलं.

**कब्जी** : स्पष्ट बोल ! पाजी नाहीं तर ?

**दौलत** : हां, पाजी म्हणूं नका. त्यापेक्षां धनी, मला ‘ मर्द मराठा ’ अशी शिवी द्या !

**कब्जी** : तुझं चऱ्हाट पुरे कर आणि लवकर तुझी फिर्याद काय आहे हें स्पष्ट सांग.

**दौलत** : ठीक आहे, स्पष्टच सांगतों. धनी, कान द्या इकडं. हें पाहा, हा दौलती पाटाचा थाट उडवून, बायकोला घेऊन खुशींत गाजरं खातखात फोंडा घाटांतून आपल्या घराकडे जात होता. इतक्यांत एक हत्तीएवढा प्रचंड वाघ आला. वाघाला पाहतांच मला स्फुरण चढलं आणि हा मर्द मराठा थरथर कांपूं लागला. वाघाची दाढी उपटून–नव्हे, दाढा उपटून त्याचीं नखं काढण्यांत मी मग्न आहें, ही संधि साधून संभाजी महाराजांनीं माझ्या बायकोचा लबेदा लढाईतील लूट म्हणून घोड्यावर टाकला आणि स्वारी तडक गडावर निघून गेली.

**कब्जी** : ( स्वगत ) अस्सं ! फर्जदाची पोर याची बाईल असावी. ( उघड ) बरं पुढं ?

**दौलत** : पुढं काय, या अपमानाबद्दल महाराजांचा सूड घ्यायचा आहे मनांतून.

**कब्जी** : मग, कसा काय सूड घेणार तूं ?

**दौलत** : देवा, आपणच मार्ग दाखवा मला.

**कब्जी** : पण हें सगळं खरं सांगतोस तूं ?

**दौलत** : मर्द केव्हांहि खोटं बोलत नाहीं. मी मर्द मराठा आहें; मग मी खोटं कसं बोलेन बरं ?

**कब्जी** : ( स्वगत ) ठीक आहे. संभाजीचा वैरी आयताच भेटला. चंडिकेची कृपाच म्हणायची. तेव्हां आतां हा लखोटा ह्याच्याच हातीं देऊन याला मोंगल छावणींत पाठवतों, म्हणजे आमचं कारस्थान बिनबोभाट पार पडेल.

**दौलत** : ( स्वगत ) याच्या पोटांत तर शिरलों, आतां काळजाला हात घालायला हरकत नाहीं. ( उ. ) देवा, दाखवाल ना या वाटसरूला मार्ग ?

**कब्जी** : हें बघ, दौलती, इच्छा असली म्हणजे मार्ग आपसुकच सांपडतो. हें बघ, मी आतां तुला जी कामगिरी सांगणार आहें ती तूं चोख रीतीनें बजावलीस म्हणजे तुझ्या सूडाचा मार्ग तुला आयताच सांपडेल.

**दौलत** : अहाहा ! देवा, माझे डोळे काढून आपल्या कानांत घालूं ? का माझ्या कातड्याचे जोडे आपल्याला देऊं ?

**कब्जी** : त्याची आतांच कांहीं जरूरी नाहीं.

**दौलत** : ( स्वगत ) ठीक आहे. पुढें देतां येतील.

**कब्जी :** हा लखोटा घेऊन तूं मोंगल छावणींत जा आणि तिथं मोंगल सेनापती तकरीबखानाच्या स्वाधीन करून त्याचा जबाब घेऊन परत ये.

**दौलत :** आपल्या आज्ञेप्रमाणं निघतोंच कामगिरीवर.

**कब्जी :** पण दौलती, हा लखोटा फार महत्त्वाचा आहे. खानाशिवाय हा दुसऱ्या कुणाचेहि हातीं पडतां कामा नये; आणि गडावर कुणालाहि या गोष्टीचा सुगावा लागतां कामा नये.

**दौलत :** त्याबद्दल धन्यांनीं बेफिकीर असावं !

**कब्जी :** गडावरचे सर्व नोकर चाकर महाराजांच्या आणि राणीसाहेबांच्या वशिल्याचे आहेत. माझ्याविषयीं त्यांचं फार वाईट मत आहे.

**दौलत :** हो, हो ! कब्जी पहिल्या प्रतीचा पाजी मनुष्य आहे—

**कब्जी :** काय म्हणालास हरामखोरा ?

**दौलत :** असं लोक म्हणतात ! देवा, त्यांचं नेहमीं असं पालुपद चालू असतं कीं, ‘ कब्जी कारभारी आणि रयत भिकारी, कब्जी कारभारी आणि रयत भिकारी ! ’

**कब्जी :** असं म्हणतात काय ? पण बेट्यांनो ! रयतच काय, पण राजाला भिकारी करीन, वैऱ्याच्या दारीं लोटीन तेव्हांच दिवाणगिरी सोडीन.

**दौलत :** ( स्वगत ) आणि स्वतःचा ताळिराम गार करून घेईन.

**कब्जी :** आणि म्हणूनच गडावरचे निमकहराम नोकर सोडून तुला या कामगिरीवर मी धाडीत आहें; कारण तुझं माझं गोत्र एक आहे.

**दौलत :** ( स्वगत ) पण जातक भिन्न आहे. मी मऊ चौपाई आणि तूं विषारी साप.

**कब्जी :** जा लवकर कामगिरीवर. तूं कामगिरी फत्ते करून आलास तर तुला पाटाची बायको देईन आणि जर का कारस्थान बिनसवलंस तर माझ्या मंत्रशक्तीनं कायमचा बागुरडा करून टाकीन.

**दौलत :** ( स्वगत ) मग मी तुमच्या मिशांच्या वळचणीला कायमची वस्ती करीन.

**कब्जी :** जा, चंडिकेचं नांव घेऊन मार्गस्थ हो. तुला एकदां वाटेला लावला म्हणजे मी निर्धास्त झालों.

**दौलत** : ( स्वगत ) कोण कुणाला वाटेला लावतो तें लवकरच कळेल. [ जातो ]

**कब्जी** : श्रीचंडिकेची कृपा ! [ जातो. ]

## प्रवेश ५ वा

( **स्थळ**–शिर्क्यांचा महाल. **गणोजी** आणि पुरुषवेषांत **राजकुंवर** प्रवेश करतात. )

**गणोजी** : काय म्हणतां, तुम्ही शिर्के आहांत आणि रायगडावरून आलां आहांत ?

**राजकुंवर** : होय सरकार !

**गणोजी** : पण त्या कर्दनकाळ संभ्याच्या रायगडावर शिर्के घराण्यांतील कुणीहि पुरुष जिवंत राहणं शक्य नाहीं आणि त्यामुळं तुम्ही शिर्के आहांत हें मला खरंसुद्धां वाटत नाहीं.

**राजकुंवर** : मी खरोखर शिर्के आहे. प्रख्यात सरदार गणोजी शिर्क्यांचा मी अगदीं निकटचा आप्त आहें सरकार.

**गणोजी** : माझा तूं निकटचा आप्त ? छे, झूट बोलतोस ! या गणोजीचे अवघे आप्त आणि सगळे सगेसोयरे त्या दुष्ट संभ्यानं ठार करून टाकले आहेत. आतां या गणोजीचा खरा आप्त एक औरंगजेब आणि सच्चे सोयरे मोंगल !

**राजकुंवर** : शिर्के–शिर्के, काय बोलतां हें ! तुमचे हे विषारी बोल या अस्सल शिर्क्यांच्या कानांना ऐकवत नाहींत.

**गणोजी** : खरंच तूं शिर्का आहेस ?

**राजकुंवर** : सरकारना माझ्या शिर्केकुलाबद्दल अजून संशय वाटतो ! गणोजी शिर्क्यांना शिर्के कुलाचा जितका अभिमान आहे तितकाच तो मलाहि वाटतो ? मी शिर्के आहें आणि सरकार, भोसल्यांची माझ्यावर पूर्ण कृपा आहे.

**गणोजी** : भोसल्यांची आणि शिर्क्यांवर पूर्ण कृपा ! अगदींच अशक्य. शिर्के–भोसल्यांचं अहिनकुलाचं वैर आहे.

**राजकुंवर** : आणि तें वैर देशाला आणि दौलतीला घातुक होत आहे असं

दिसल्यामुळं, उभय कुलांतील पूज्य देवतांच्या प्रेरणेनं या दोन्ही प्रख्यात कुलांची दिलजमाई करण्यासाठीं, मी सरकारच्या पायांपाशीं आलों आहें.

**गणोजी** : दोन्ही कुलांची दिलजमाई तेव्हांच होईल कीं, ज्या वेळीं या गणोजीच्या समशेरीनं त्या संभ्याचं शीर चेंडूप्रमाणं अस्मानांत उडेल आणि रायगडावर घारीगिधाडं घिरट्या घालूं लागतील. तूं शिर्का आहेस ना ? आणि तुला शिर्के भोसल्यांचं सख्य व्हावं असं मनापासून वाटतें ना ?

**राजकुंवर** : होय सरकार, अगदीं अंतःकरणाच्या तळमळीपासून तसं वाटतं.

**गणोजी** : आणि भोसल्यांची तुझ्यावर पूर्ण कृपा आहे ! मग वेड्या माणसा, माझ्याकडे धापा टाकीत येण्याचे कष्ट कशाला घेतलेस ? अरे, संधि साधून गाफील गांठून तूं संभ्याला तिथंच गारद करून कां टाकीत नाहींस ! म्हणजे पक्की दिलजमाई होऊन जाईल ?

**राजकुंवर** : शिव शिव ! शिर्के कुलांतील कुलवंताच्या जिभेला असली अभद्र वाणी बोलवते तरी कशी ? सरकार, आपण रायगडावर चला—

**गणोजी** : कशाला ? त्या संभ्याच्या तरवारीपुढं गर्दन द्यायला ?

**राजकुंवर** : नाहीं. महाराजांच्या तरवारीपुढं तुमची गर्दन द्यायला नव्हे किंवा तुमच्या तरवारीपुढं महाराजांची गर्दन मारायलाहि नव्हे, तर शिर्के भोसल्यांनीं एका ताटांत बसून दूधभात जेवायला. शिर्के राजे, तुम्ही रायगडावर चला.

**गणोजी** : अस्सं ! आतां सर्व कारस्थानाचा उलगडा झाला. स्वतः शिर्का असल्याचा बहाणा करून, मला गफलतीनं गडावर न्यायचा आणि तिथं त्या मन्दोन्मत संभ्याच्या समोर ठार करून टाकायचा असाच तुझा मनसुबा. हरामखोरा, सत्य सांग, खरंच तूं शिर्का आहेस कां त्या संभ्यानं या गणोजीचा घात करण्यासाठीं धाडलेला मांग आहेस ? बोल लवकर.

**राजकुंवर** : सरकार, आपला घात करणारा मांग मी नाहीं; तर आपला होऊं घातलेला घात आणि अधःपात टाळण्यासाठीं रात्रंदिवस तळमळणारी ही आपली पत्नी राजकुंवर आहे. ( डोक्याचा फेटा काढते. )

**गणोजी** : कोण ! राजकुंवर ? माझी पत्नी राजकुंवर !

**राजकुंवर** : होय महाराज.

**गणोजी** : नवऱ्याशीं तुझे नेहमीं खटके उडतात म्हणून रागानं तूं माहेरीं

निघून गेलीस आणि पुन्हां तुझं तोंडसुद्धां पहायचं नाहीं असा मीं निश्चय करून तुला वाड्यांत येण्याची बंदी केली होती.

**राजकुंवर** : आणि एवढ्यासाठींच, पहारेकऱ्यांनीं मला प्रतिबंध करूं नये म्हणून या पुरुषवेषानं मी इथं आलें.

**गणोजी** : पण इथं येण्याचा तुझा मतलब ?

**राजकुंवर** : शिर्क्यांनीं मोगलांचं सहाय्य घेऊन मराठ्यांच्या दौलती-वर——

**गणोजी** : गाढवाचे नांगर फिरवण्याचं ठरवलं आहे. पुढं काय म्हणतेस ?

**राजकुंवर** : महाराज, जरा शांतपणानं माझं बोलणं ऐकून घ्या. नाथ, मी भोसले असलें तरी शिर्के घराण्याची मला मातबरी वाटते व म्हणून मी काकुळतीनें विनंति करतें कीं, महाराष्ट्रांतल्या मातब्बर मराठ्यांनीं आपापसांत भांडत राहून दुहीचा डंका वाजवावा आणि वैऱ्याला घरांत शिरावयाला संधि द्यावी हें अत्यंत लांच्छनास्पद आहे.

## पद ९ वें

**मार्ग नच बरवा । नाथ हा,**
**स्वकुलघातक कासया होतां ? ॥ धृ० ॥**
**परक्यापायीं लोळण घेतां ।**
**स्वकियांच्या कां नाशाकारितां ॥ १ ॥**
**थोर कुलाची शपथ तुम्हांला ।**
**राष्ट्ररक्षणा सिद्ध झाणिं व्हा ॥ २ ॥**

**गणोजी** : राजकुंवर, वाऱ्यानें वणवा विझत नाहीं तर अधिकच फैलावतो. तुझ्या बोलण्यानं माझ्या डोक्यांतला सूडाचा वान्हि विझण्याऐवजीं तो माझ्या सर्वांगांत संचरूं लागला आहे.

**राजकुंवर** : पण महाराज, आपल्या या वागणुकीनं आबासाहेबांनीं महाप्रयासांनीं उभारलेली ही मराठेशाहीची इमारत डळमळूं लागली आहे. छत्रपतीला खाऊन टाकण्यासाठीं टपून बसलेला अलमगीर, स्वतःचा मतलब साधल्यावर, आपणांला चिरडून टाकल्याशिवाय थोडाच राहणार आहे ?

**गणोजी** : स्वतःचं पुढं काय होईल याचा आम्हांला बिलकुल विचार कर्तव्य

नाहीं, फक्त संभ्याच्या मृत्यूशीं आमचा मतलब. एकदां महाराष्ट्राचा राजा उलथला, म्हणजे या गणोजीच्या आयुष्याचं सार्थक होईल !

**राजकुंवर** : मुळींच नाहीं, उलट शिर्क्यांचं आयुष्य कवडीमोल ठरेल. महाराज, ज्या दख्खन दौलतीचा डोलारा तानाजी, बाजीसारख्या मोलाच्या मोहऱ्यांनीं आपल्या प्राणांचं मोल देऊन उभा केला, त्याला शिर्क्यांसारख्या जातिवंत मराठ्यांनीं दुष्मनांच्या सहाय्यानं धुळीला मिळण्यासाठीं धडपडावं हें पाहून या राजकुंवरच्या मनाला दुःसह यातना होतात.

**गणोजी** : मग या नेहमींच्या रडकथा गाऊन, माझा माथा भडकवायला तुझी धिंडका इथं आली कशाला ?

**राजकुंवर** : सासरमाहेरच्या दोन्ही कुलांतील देवतांनीं आदेश दिला आणि माझं कर्तव्य स्वस्थ बसूं देईना, म्हणून मी आलें ! नाथ, हा अविचार मनांतून काढून टाका. मराठ्यांची राजलक्ष्मी तुमच्याकडे आशेनं डोळे लावून बसली आहे, तिचा हिरमोड करूं नका. छत्रपतींच्या सिंहासनाच्या संरक्षणासाठीं, तुमची शौर्याची समशेर म्यानाबाहेर काढा आणि देशाच्या दुष्मनाला अटकेपार पिटाळून लावा.

**गणोजी** : मराठ्यांचा दुष्मन अलमगीर असला तरी या गणोजीचा दुष्मन तो संभाजी आहे; आणि त्याला या दुनियेपार पिटाळून लावायची मीं प्रतिज्ञा केली आहे.

**राजकुंवर** : महाराज, आपल्या नीच कृत्यानं शिर्क्यांची कुलस्वामिनी शिरकाई माता आपल्यावर भयंकर रुष्ट होईल बरं !

**गणोजी** : कुछ् फिकीर नहीं ! रुष्ट झालेल्या शिरकाई मातेला, संभ्याचं शिरकमल वाहून मी संतुष्ट करीन.

**राजकुंवर** : हरहर ! माझ्या जिवाच्या आळवणीचा स्वारीच्या मनावर रतिमात्रहि परिणाम होऊं नये अं ? महाराज, मी पुन्हां पदर पसरून विनंति करतें कीं, हा अधोगतीचा मार्ग आपण पत्करूं नका. व्यक्तीचा सूड घेण्याच्या नादांत, राष्ट्राच्या कल्याणाची तुम्ही राखरांगोळी करतां आहांत हें आपल्या लक्षांत अजून कसं येत नाहीं ? मागं हिंदुधर्माचा त्याग करून अविचारानें मुसलमान बनूं पाहणाऱ्या गणोजी शिर्क्यांना, पुण्यश्लोक आबासाबेहांनीं आवर घातला आणि प्रत्यक्ष आपली मुलगी त्यांना देऊन शिर्के-भोसल्यांचं नातं

दृढ केलं; त्या छत्रपति शिवाजी महाराजांच्या पुण्याईची तुम्हांला शपथ आहे.

**गणोजी** : शिवाजीची पुण्याई त्याच्याबरोबरच कैलासवासी झाली. त्याची ती मृत पुण्याई मी लाथेखालीं तुडवतों.

**राजकुंवर** : छे: ! आतां मात्र कडेलोट झाला. आतां माझ्या धमनींतलं भोसल्यांचं रक्त मला स्वस्थ बसूं देणार नाहीं. नाथ, माझी विनवणी वायां गेली, आर्जवं फोल ठरलीं. तेव्हां आतां वीरकन्येचं कठोर कर्तव्य करायला मला सिद्ध झालंच पाहिजे.

**गणोजी** : मग जा. रायगडावर जा आणि तुझ्या त्या उन्मत्त भावाला माझा निरोप कळव कीं, तुझा काळ गणोजी लवकरच गडावर चाल करून येतो आहे. तेव्हां तुला कांहीं शेवटची निरवानिरव करायची असेल तर करून ठेव !

**राजकुंवर** : शिर्क्यांचीं पापी पावलं गडाला लागणं मुष्कील आहे.

**गणोजी** : तें थोड्याच वेळांत तुला समजेल. एकदां संभाजीला कब्जीनं गडाखालीं आणला कीं, आमचं निम्मंशिम्मं काम झालं ! आंगठींतून खडा बाहेर पडल्यावर कोंदणाला विचारतो कोण ? आगाऊ फितुरीच्या मंत्रांनीं भारून टाकलेला पिसाळ, गडावरील भगवा झेंडा उपटून काढून त्या ठिकाणीं मोंगलांचा विजयी झेंडा फडकविल्याशिवाय थोडाच राहणार आहे ?

**राजकुंवर** : ( स्वगत ) अस्सं काय ? एकूण अशी मसलत योजली आहे काय या चांडाळांनीं ?

**गणोजी** : एव्हांना कब्जीनं संभ्याला गडाखालीं आणलासुद्धां असेल. आतां माझा सूड खात्रीनं सफल होणार !

**राजकुंवर** : ( स्वगत ) आतां मला जलदीनं रायगड गांठला पाहिजे. ( उघड ) नाथ, जीव राहात नाहीं म्हणून पायीं शेवटची विनंति करतें कीं, दुसऱ्या कोणत्या कारणासाठीं म्हणून नव्हे पण आपल्या बहिणीच्या—राणी येसूबाईच्या—सौभाग्यरक्षणासाठीं तरी आपण सूडाचा विचार सोडून द्या.

( पाय धरते. )

**गणोजी** : हा गणोजी जातिवंत मराठा आहे. मी प्रतिज्ञाभंग केव्हांहि करणार नाहीं. माझा सूड साधण्यासाठीं बहीण रंडकी झाली किंवा बायकोची राख झाली तरी त्याची मला पर्वा नाहीं. ( लाथ मारतो. )

**राजकुंवर** : नाथ, ही लाथ आपण आपल्या पत्नीला मारली नाहीं तर

शिवप्रभूच्या कन्येला मारली आहे. भोसल्यांचं कुलदैवत मोठं कडक आहे. मी जर खरीखुरी भोसल्याची अवलाद असेन तर, आपल्या राजाच्या प्राणा-वर उठलेल्या आणि मराठेशाही बुडवूं पाहाणाऱ्या या नादान शिर्क्यांना कठोर शासन केल्याशिवाय कधींच राहणार नाहीं.

**गणोजी** : या बेफाट भोसलीच्या फुसक्या धमकावणीला कोण भीक घालतो ? शिरकाणाचा दगड मारून त्या संभ्यानं डिवचलेला हा साप डूक धरून दंश केल्याशिवाय थोडाच राहाणार ? माझ्या तरवारीनं संभाजीचा शिरच्छेद झालाच पाहिजे.

**राजकुंवर** : तर मग शिर्के, मी अखेरचं बजावून ठेवतें कीं, शिर्क्यांची समशेर संभाजीच्या मानेवर पडण्यापूर्वीं या राजकुंवरच्या समशेरीनं गणोजीची मान धडावेगळी होईल.

[ जाते. **गणोजी** तुच्छतेनें पाहत निघून जातो. ]

## अंक १ ला समाप्त

*

# अंक २ रा



## प्रवेश १ ला



( **स्थळ**–रायगडावरील **कब्जीची** खाजगी बैठक )

**कब्जी :** आज या कब्जीच्या कारस्थानी करामतीचा कळस होणार यांत शंका नाहीं ! एकदां संभाजीला अलमगिरीच्या स्वाधीन केला कीं, आम्ही जहागिरीवर जाण्यासाठीं प्रस्थान ठेवलंच म्हणून समजा. राणी येसूबाई, तो रड्या राघोजी राजाराम, तीं चिटणिसाची कार्टी खंड्या–निळ्या; यांनीं या कब्जीविरुद्ध काहूर उठवून, आम्हांला प्रधानपदावरून उखडून टाकण्यासाठीं जंग जंग पछाडले. पण मद्य, मांस आणि मदिराक्षी यांच्या नित्य सेवनानं शक्तिसंपन्न बनलेल्या या शक्तिपंथी मांत्रिकानं, धर्मभोळ्या संभाजीला बगलेंत मारला आणि गडावरील साऱ्या पिशाच्चांना जागच्या जागीं जखडून टाकलं. पण अजून तुळशी कशी येत नाहीं ? ती पोर भारीच हुषार आणि हिकमती आहे. संभाजीला आपल्या मोहजालांत पकडल्याशिवाय ती खात्रीनं राहाणार नाहीं. अरे वा ! हा आलाच गोमांतकी आंबा. हा दिसायला जसा सुंदर, तसाच खायलाहि गोड आहे. ( **तुळशी** येते ) ये तुळशी. तूं काम फत्ते करून आल्याबद्दल मी तुला देवीचा प्रसाद देणार आहें. पण अगोदर सांग; मासा जाळ्यांत सांपडला कीं नाहीं !

**तुळशी :** कब्जी, तो मासा साधा का आहे ? अहो देवमासा तो. तुळशीच्या तरळ जाळ्यांत तो थोडाच गवसणार आहे ?

**कब्जी :** काय ? तुझ्या मोहक सौंदर्याची, मादक तारुण्याची आणि मनोहर मुरक्यांची मात्रा संभाजीवर लागू पडली नाहीं ?

**तुळशी :** संभाजी एक विलासी रंगेल राजा आहे अशी माझी समजूत होती; पण प्रत्यक्ष अनुभव अगदींच निराळा आला बाई ?

**कब्जी** : काय तुळशी, संभाजीनं तुझ्या पाठीवर प्रेमानं हात टाकला नाहीं? तुझा हात धरून त्यानं तुला जवळ ओढून आलिंगन दिलं नाहीं? तुझ्या मुखकमलाभोंवतीं फिरणारे हे भ्रमर, त्यानें एकदांसुद्धां हाकलले नाहींत? किंवा तुला आपल्या बाहुपाशांत घट्ट आवळून तुझ्या ह्या गोंडस गालाचं चुंबन घेतलं नाहीं?

**तुळशी** : छे हो. प्रेमाचा एकही प्रकार त्यानं केला नाहीं. माझ्या रतिक्रीडेचा त्याच्या मनावर यत्किंचित परिणाम झाला नाहीं; उलट मी त्याच्यावर अनुरक्त आहें असं दर्शवितांच, त्यानं मातोश्री म्हणून मला एकदम दंडवत घातला.

**कब्जी** : असं कसं झालं? चाफळ खोऱ्यांतल्या त्या गोसावड्याची आणि संभाजीची गांठ पडली कीं काय?

**तुळशी** : माझे मदनाचे पांची बाण वापरल्यावांचून भात्यांतच भरून ठेवावे लागले मला. राणी बनून राजविलास भोगण्याची माझी मनींची हौस मुळांतच मारली गेली.

**कब्जी** : तुळशी, अशी निराश होऊं नकोस. तुझी मनींची हौस आणि तनूचं सुख अजूनहि तुला लाभूं शकेल. संभ्यानं जरी तुझ्यापुढें दंडवत घातला तरी हा कब्जी तुझी सर्व प्रकारची हौस पुरवायला मुळींच आढेवेढे घेणार नाहीं किंवा मागंपुढं पाहाणार नाहीं समजलीस!

**तुळशी** : पण कब्जी, तुमच्यासारखा अत्तरविक्या, माझ्या कानांत फार तर हेन्याचा एखादा फाया घालील किंवा मनगटावर खस चोळील; पण तेवढ्यानं माझी तृप्ती थोडीच होणार आहे? शिवाय, तुम्ही मांत्रिक असल्यामुळं उगीच भुतं जागवून मला वरचेवर भेदरून मात्र सोडाल झालं?

**कब्जी** : तुळशी, तूं निव्वळ वेडी आहेस. आज रायगडावर आणि तमाम दौलतींत या कब्जीची निरंकुश सत्ता चालते आहे, हें तुला माहीत नाहीं म्हणूनच तूं असं बोलतेस. कोणालाहि अधिकारावरून बडतर्फ करणं किंवा जहागीर बहाल करणं ह्या गोष्टी संभाजीच्या आज्ञेऐवजीं माझ्याच शिक्कामोर्तबानं होत असतात. अग, मी मनांत आणीन तर खुद्द संभाजीलासुद्धां सिंहासनावरून खालीं खेंचीन.

**तुळशी** : कब्जी, खरंच कांहो तुमचं एवढं सामर्थ्य आहे?

ब्जी : नाजुक पोरी, या कब्जीच्या दिव्य सामर्थ्यापुढं तूंसुद्धां चट्दिशीं ड्वत घालशील मग, इतर बायकांची कथा काय ? म्हणून म्हणतों, पहि-ाच्च पवित्र्यांत शिकार साधली नाहीं म्हणून निराश न होतां, युक्तीयुक्तीनं वज आपल्या छापेंत आणण्याचा तुझा प्रयत्न चालू ठेव, म्हणजे आपला र्यभाग खात्रीनं तडीस जाईल.

ळशी : पण मला नाहीं वाटत संभाजी माझ्या फंदांत पडेलसं ! एकवेळ ाळाला अंकुर फुटेल, आत्याबाईला मिसरूड फुटेल, पण महाराजांना ाचा पाझर कांहीं फुटणार नाहीं.

ब्जी : तुळशी, फुकट–फुकट तुमचा बायकांचा जन्म. एका रंगेल राजाच्या ाला जर तुला भुरळ पाडतां येत नाहीं, तर हा एवढा नवतीचा बहार ाणि सौंदर्याचा बाजार जवळ कशाला बाळगला आहेस तूं ? तें कांहीं हीं. संभाजीला नादीं लावून त्याला पक्का नंदीबैल बनवलाच्च पाहिजेस तूं.

ळशी : पण कब्जी, महाराज माझ्याकडे नुसते प्रेमानं पाहायलासुद्धां ार नाहींत, मग मी त्यांना नादीं कशी लावणार बरं ? त्यापेक्षां आतां ों जावं आणि दादल्याबरोबर मजेंत संसार करावा असें मला वाटूं गलं आहे. ते आतां चांगले मर्दगडी झाले आहेत असं मला ताईसाहेबां-ून समजलं आहे. कब्जी, मी आपली माझ्या नवऱ्याकडेच्च जातें कशी ! ाऊं लागते )

ब्जी : तुझ्या नवऱ्याला वाघानं खाऊनसुद्धां टाकला कधींच.

ळशी : अगबाई ! मर्दपणा गाजवायला गेले आणि गारद झाले कीं य ?

ब्जी : तेव्हां इथंच्च सुखानं राहणं तुझ्या हिताचं आहे. म्हणून सांगतों शी, तूं कसंहि करून महाराजांना वश करून घे. अग, तुला माहीत नाहीं , लोखंडाचे चणे खाणारा एवढा विश्वामित्र, आरंभीं मेनकेकडे ढुंकूनहि ायला तयार नव्हता; पण मेनकेनं चिकाटी सोडली नाहीं. मदनास्त्राचा ा मारा तिनं चालवला कीं, तपोनिष्ठाची स्वारी आसन सोडून मेनकेच्या ां लागली आणि तिला माता बनवून मोकळी झाली. पूर्वीच्या बायका ासारख्या रडूबाई नव्हत्या, करूबाई होत्या बरं करूबाई !

ळशी : अहो, पण कब्जी, महाराज मोकळेपणानं एकांतांत मला गवसतील

तेव्हां ना पुढच्या साऱ्या गोष्टी. पण महाराजांच्या आपल्या सदान्कदा स्वाऱ्या आणि मोहिमा चालू असतात. बिचाऱ्या राणीसाहेबांचे मात्र पुरे हाल आहेत झालं !

**कब्जी** : राणीसाहेबांचेच काय, पण छत्रपतींच्या राज्यांतल्या सर्व राजपुरुषांचे आणि रयतेचे पुरे पुरे हाल होणार आहेत लवकरच; आणि एवढ्यासाठींच तुळशी, तुझ्या साहाय्याची मला फार जरूर आहे.

**तुळशी** : लोकांचे हाल करण्यासाठीं, कब्जी, तुम्हांला माझी गरज आहे ?

**कब्जी** : होय, माझ्या कारस्थानाच्या गळाला तुझं मोहक अमिष लावून मी संभाजीला गडाखालीं नेणार आहे आणि त्याला अचूक अलमागिराच्या स्वाधीन करून बारा लाखांची जहागीर अस्मादिक मिळवणार आहेत.

**तुळशी** : काय म्हणतां कब्जी, तुम्ही महाराजांना मोंगलांच्या हवालीं करणार ?

**कब्जी** : होय, या कनोजी ब्राह्मणानं तशी कसमच खाल्ली आहे.

**तुळशी** : शिव–शिव ! कब्जी, ब्राह्मणापोटीं जन्म घेऊन कसाबाची करणी करणार तुम्ही ! बारा लाखाच्या मोबदल्यावर विश्वमोलाचा छत्रपति तुम्ही वैऱ्यांना विकणार ? धिःकार, धिःकार असो तुमच्या अधमपणाला !

**कब्जी** : तुळशी, तोंड आवर.

**तुळशी** : खाल्ल्याघरचे वासे मोजणाऱ्या आणि धन्याच्या ताटांत दूधभात जेवून, त्याच्याच नरडीला चावा घेणाऱ्या तुझ्यासारख्या कृष्णसर्पाला जोड्यानंच ठेचला पाहिजे.

**कब्जी** : तुळशे, तुळशे, छेड काढून भुतांना बोलायला लावणाऱ्या या मांत्रिकाला असं तेढं बोलून विनाकारण छेडूं नकोस. हा मांत्रिक भुतांप्रमाणं माणसांनाहि गाडण्यांत पटाईत आहे. म्हणून तुला बजावून ठेवतों कीं, तुझ्या जिभेच्या जखिणीला सैरावैरा धांवूं देऊं नकोस; नाहींतर मंतरलेले तांदूळ मारावे लागतील मला.

**तुळशी** : मग पाहूंच द्या तुमचं मंत्रसामर्थ्य. मारा पाहूं तांदूळ. ही राहिलें झाडासारखी उभी ( त्याच्यापुढें तोऱ्यानें उभी राहते. )

**कब्जी** : पुष्कळ झाडं पाहिलीं पण हें तुळशीचं झाड मोटं खट्याळ आहे बेटं. !

ळशी : चालवा ना तुमचं मंत्रसामर्थ्य ! कां माझ्याकडे पाहतांच तुमच्या ाची माती आणि तांदुळाचं पीठ झालं एकाएकीं ?

ज्जी : तुळशीवर कोणतीही मंत्रविद्या प्रभाव पाडूं शकत नाहीं; कारण ळशीचं झाड हें देवाचं झाड आहे.

ळशी : उगाच भोळ्या भाबड्या लोकांना मंत्रतंत्राच्या भूलथापा द्यायच्या, ाट्यानाट्या भुतांचा बागुलबोवा दाखवून त्यांना आपल्या भजनीं ावायचं. आणि स्वतःचा तळीराम गार करून घ्यावयाचा ! थांबा, आतां ऊन महाराजांना तुमचं सर्व कारस्थान सांगतें. ( जाऊं लागते. )

ज्जी : अग अग अवदसे, तसला कांहीं मूर्खपणा करूं नकोस.

ळशी : हां, खबरदार मला अडवाल तर. मी जाणारच महाराजांकडे.

ज्जी : जा जा, खुशाल महाराजांकडे जा, नाहींतर एखाद्या महाराकडे जा. ाराजांचा माझ्यावर इतका विश्वास आहे कीं, खुद्द ब्रह्मदेव येऊन जर या ज्जीविरुद्ध कागाळ्या सांगूं लागला तर त्यालासुद्धां महाराज धक्के मारून लवून देतील; मग तुझ्यासारख्या रानांत सांपडलेल्या गावरान पोरीची ा ती काय ? ( स्वगत ) हिला जरा चुचकारून घेतली पाहिजे. ( उघड ) ा तुळशे, थोडी इकडे ये. तुला हें माहीत आहे कां ?

ळशी : काय काय ?

ज्जी : तूं फर्जंदाची पोर नव्हे का ?

ळशी : हो.

ज्जी : तुझा बाप हिरोजी कसा मेला तें तुला ठाऊक आहे ?

ळशी : नाहीं. कसे गेले माझे बाबा ?

ज्जी : मी सांगतों. पण माझ्या सांगण्यावर तुझा विश्वास बसायचा नाहीं. आपली म्हणायचीस कीं, कब्जी आपली कांहीं तरी कल्पित कथा गत आहेत म्हणून

ळशी : पण प्रथम सांगाल तर खरें ? माझ्या बापाच्या मृत्यूची सत्यकथा ाजलीच पाहिजे मला.

ज्जी : वेडे पोरी, ज्यांच्या थोरपणाबद्दल तुला एवढा आदर वाटतो आणि ्मोलाचा छत्रपति म्हणून तूं नुकतेच ज्याच्या नांवाचे पोवाडे गाइलेस, त्या संभाजीनंच तुझ्या पित्याला आणि छत्रपतींच्या नेकजात सरदाराला

—हिरोजीला नाहक हत्तीच्या पायीं देऊन हाल हाल करून ठार मारलं?

**तुळशी** : अगबाई! कब्जी, खरं सांगतां हें तुम्ही?

**कब्जी** : तुझ्या गळ्याची शपथ. मी सांगतों त्यांत शब्दमात्र खोटेपणा नाहीं. काय त्या वेळचा तो करुण देखावा? महाराज सदरेवर बसले आहेत, समोर एक भला मोठा मस्त मतंगज सोंड फिरवीत उभा असून 'सुपासारख्या' आपल्या कानांनीं, अंकुशाच्या आघातांनीं अस्वस्थ झालेल्या गंडस्थळाला वारा घालतो आहे; इतक्यांत हातापायांत भल्या मोठ्या बेड्या घातलेल्या हिरोजीला महाराजांसमोर आणून उभा केला. तो बिचारा महाराजांपाशीं दयेची याचना करीत होता. पण त्या निर्दय संभाजीनं, त्याची याचना किंवा आमची विनंति, यांची पर्वा न करतां सेवकांना हुकूम केला. त्यासरशीं हिरो-जीला हत्तीच्या पायांशीं साखळदंडानं बांधला आणि माल्याबरच्यांनीं त्या हत्तीला चिडवून मुद्दाम मस्त करण्यांत आला. काय सांगूं तुळशी, क्षणांतच हिरोजीच्या देहाचे राईराईएवढे तुकडे झाले! रक्तमांसाच्या लेपनानं हत्तीचे पाय मेंदी लावलेल्या मारवाडी तरुणीसारखे दिसूं लागले! त्याच्या अस्थी गोळा करायला आप्तमंडळी गेली, पण त्यांच्या हातीं हाडांचा भुगा लागला बघ!

**तुळशी** : अगआई! अंगावर कांटा आला!

**कब्जी** : कांटा आला ना! साहजिकच आहे. अग, ही हकीकत ऐकून तुझ्या अंगावर हलव्यासारखा हळुवार कांटा आला असेल, पण तो भयंकर देखावा पाहात असतांना, आमचे देह तर पोरी, बोरीसारखे फुलून गेले कांट्यांनीं!

**तुळशी** : माझ्या बाबांचा असा निर्दयपणानं खून करणाऱ्या त्या दुष्टाचं निःसंतान होईल अगदीं!

**कब्जी** : त्याचं निःसंतान व्हावं असं तुला खरोखर वाटत असेल आणि आपल्या बापाच्या वधाचा सूड घेण्याची जर तुझी इच्छा असेल तर तुळशी, त्याच्या नांवानं नुसतीं बोटं मोडायचीं नाहींत, तर त्याची पुरी खोड मोडायची आणि शाब्दिक शापापेक्षां त्याच्या गळ्याला विषारी कारस्था-नाचा चाप लावून त्याला या जगांतून कायमचा नाहींसा करावयाचा. काय समजलीस?

**तुळशी :** त्या संभाजीला ठार करून माझ्या बाबांच्या अमानुष वधाचा सूड उगवल्याशिवाय ही फर्जंदाची पोर कदापि राहणार नाहीं ( जाते. )

**कब्जी :** शेवटीं हट्टी पिशाच्च झाडाला सोडून गेलं. श्रीचंडिकेची कृपा !

( पडदा पडतो. )

---

## प्रवेश २ रा



[ **स्थळ**:– रस्ता. **दौलतराव** प्रवेश करतात. ]

**दौलत :** कसा झाला तरी हा मर्द मराठा आहे. मग काम फत्ते केल्याशिवाय कसा राहील ? धन्यानं सांगितलेली कामगिरी जो इमानानं पार पाडीत नाहीं तो मराठा तर नाहींच आणि मर्द मराठा तर नाहींच नाहीं. त्या दिवशीं ताईसाहेबांनीं मला मर्द व्हायला सांगितलं, लागलीच मर्द बनून पार झालों. छातीठोकपणानं मोंगल छावणींत गेलों; कब्जीचा लखोटा तकरीबखानाच्या स्वाधीन केला आणि त्याचा जबाब घेऊन परत फिरलों. याला म्हणतात मर्द मराठा ! पूर्वीं मोंगल छावणी म्हटली, म्हणजे भुतांची मजलस वाटून, छाती धडधडायला लागायची आणि ते तिस्मारखां, ते मुरगीखां, ते जोरूखां, ते गोबरखां हे सगळे खवीस, जणूं काय खायला आल्यासारखे वाटायचे ! पण आतां त्याची मुळींच भीति वाटत नाहीं मला. हा मर्द होण्याचा प्रभाव आहे. आतां आमची म्होतुराची बायको तुळशी, या मर्द मराठ्याच्या मागं, लावसटीसारखी लागल्याशिवाय राहणार नाहीं.

### पद १० वें

( **चाल**:— आला खुशित समिंदर. )

**आतां बघुनि नवऱ्याचा, थाट मर्दाचा, बाईल येईल घरीं ।**
**परत हो भुलेल माझ्यावरी ॥ धृ० ॥**
**मी सुंदर ती सुंदरी । मी डमरू ती खंजिरी ।**
**मी बोका ती मांजरी । मग रमेल बाइल परोपरी ।**
**नांदेल नार प्रीतिनं । तोरा मग जिरेल जाग्यावरी ॥ १ ॥**

**मी पांवा ती बासरी । मी भोवरा ती भिंगरी ।**
**मी हपूस ती पायरी । जग भुलेल आमच्या जोडीवरी ।**
**म्होतुर पुन्हां होईल । मर्द हा चढेल बोहल्यावरी ॥ ३ ॥**

( **जोत्याजी** प्रवेश करतो )

**जोत्याजी :** ( स्वगत ) त्या मांगहृदयी कब्जीच्या वाक्यांत कांहीं तरी भयंकर कारस्थान चालू असून, खुद्द महाराजांच्या जिवावर घाला घालण्याचा त्या दुष्टाचा विचार दिसतो आहे; तेव्हां त्या सर्पाच्या हालचालीवर, चांगलीच पाळत राखली पाहिजे. ( उघड ) कोण ? दौलतराव ?

**दौलत :** होय जोत्याजीराव, तोच मी मर्द मराठा आहें.

**जोत्याजी :** पण तुम्हांला सरकारांनीं हद्दपारीची शिक्षा दिली असतांना, येथें येण्याचं धाडस तुम्ही कां केलंत ? महाराजांची कदर तुम्हांला माहीत नाहीं वाटतं ?

**दौलत :** राजांची कदर मला चांगली माहीत आहे; पण महाराजांनीं माझ्या-वर उगारलेली हद्दपारीची तरवार, राजकुंवर ताईसाहेबांनीं अलगद उचलून घेतली आणि मला माफी देवविली.

**जोत्याजी :** एकूण ताईसाहेबांमुळं तुमची शिक्षा आणि मृत्यु हीं दोन्ही टळलीं म्हणायचीं ! पण दौलतराव, हा लखोटा घेऊन तुम्ही कुठं चाललां आहांत ?

**दौलत :** अरेरे ! तो तुमच्या दृष्टीला पडला ना ? सगळा घोंटाळा झाला !

**जोत्याजी :** म्हणजे ? तो लखोटा गुप्त होता कीं काय ?

**दौलत :** अहो, गुप्त म्हणून काय विचारतां ? फार गुप्त, अत्यंत गुप्त होता हो. पण कावळ्यासारखी तुमची नजर त्याच्यावर पडली आणि हा गुप्त मामला उघड झाला एकदम. जोत्याजीराव, ह्या गुप्त गोष्टीवर प्रकाश पाड-ण्याचा पाजीपणा कशाला हो केलात ?

**जोत्याजी :** चूप रहा ! तो लखोटा कोणी दिला आणि त्याच्यांत काय रहस्य आहे तें मला आतां समजलंच पाहिजे. आणा तो लखोटा इकडे.

**दौलत :** पण कोणाचंहि गुप्त पत्र फोडून वाचूं नये जोत्याजीराव !

**जोत्याजी :** तो शहाणपणा आपण मला शिकवूं नका दौलतराव !

**दौलत :** असे तिरीमिरीवर काय येतां हो ? तुम्ही तेवढे शूर गडी आणि

मी नुसताच मर्द मराठा आहें होय ?

**जोत्याजी** : मुकाट्यानं तो लखोटा माझ्या स्वाधीन करा; नाहींतर फुकट प्राणाला मुकाल.

**दौलत** : प्राण गेला तरी बेहेत्तर, पण माझ्या धन्याची ही अब्रू तुम्हांला घेऊं देणार नाहीं मी.

**जोत्याजी** : तर मग पाजी माणसा, तुझा कान पिळून–( कान पिळतो. )

**दौलत** : ' बळी तो कान पिळी ' म्हणतात तो असा.

**जोत्याजी** : हा लखोटा तुझ्या हातांतून हिसकावून घेतों.

**दौलत** : नका हो, जोत्याजीराव, या हिसकाहिसकींत तें गुप्त रहस्य बाहेर पडेल. नका हो. त्या लखोट्यांत माझ्या धन्याचीं अंडीपिल्लीं कब्जीचीं कुलंगडीं आहेत हो. तुम्ही नका त्या लखोट्याच्या भानगडींत पडूं. काय, नाहीं ऐकत ? मग घ्या हा. घाला उरावर ! ( लखोटा देतो. )

**जोत्याजी** : कब्जीच्या कारस्थानाबाबत कांहीं तरी महत्त्वाची बातमी ह्या लखोट्यांत असली पाहिजे. ( लखोटा फोडूं लागतो. )

**दौलत** : हां–हां ! ताईसाहेबांच्या हुकुमाशिवाय तो लखोटा फोडायचा नाहीं कुणी. मी लखोटा घेऊं दिला, पण तो फोडूं देणार नाहीं. तसं असतं तर कब्जीचं रहस्य मीच फोडून टाकलं नसतं का ? जोत्याजीराव, मी तो लखोटा ताईसाहेबांकडे नेऊन देणार आहें.

**जोत्याजी** : हा कब्जीचा लखोटा ! आणि तूं ताईसाहेबांकडे नेऊन देणार ? म्हणजे हें काय गौडबंगाल आहे !

**दौलत** : तें गौडबंगाल फार निराळं आहे. पिकल्या केसांच्या जोत्याजी-रावांना तें कळायचं नाहीं. तें कळायला नुकतीच मिस्रूड फुटलेले आमच्या-सारखे मर्द मराठे पाहिजेत.

**जोत्याजी** : तें जाऊं द्या. पण दौलतराव, मला प्रथम सांगा कीं, या लखोट्याची काय भानगड आहे ?

**दौलत** : अहो राव, रायगडची भानगड आहे. आतां तुम्हांला सर्व काहीं सांगतों. अहो, कब्जीनें माझ्याजवळ एक लखोटा देऊन, तो मोंगल सरदार तकरीबखानाला नेऊन द्यायला सांगितलं होतं. त्याप्रमाणं कामगिरी बजावून, त्याचा जबाब घेऊन मी परत ताईसाहेबांकडे—

**जोत्याजी** : काय, ताईसाहेबांकडे ?

**दौलत** : होय–होय, ताईसाहेबांकडे ? मी नोकर कब्जीचा आणि चाकरी करतों ताईसाहेबांची ! कब्जीचा निरोप मोंगलांना जाऊन कळवावयाचा आणि मोंगलांची मसलत ताईसाहेबांना येऊन कळवायची, हा या मर्द मराठ्याचा हल्लींचा दिनक्रम आहे. काय समजलांत ?

**जोत्याजी** : एकूण तुम्हींसुद्धां स्वामीकार्यार्थ झटणारे इमानी सेवक आहांत तर ?

**दौलत** : मग, तुम्हांला काय वाटलं ? तुम्ही तेवढे स्वामिनिष्ठ सेवक आणि आम्ही कर्मनिष्ठ हजाम आहोंत होय ? जोत्याजीराव, आमच्यांतमुद्धां शत्रूला पाजायला पाणी आहे म्हटलं !

**जोत्याजी** : शाबास शाबास ! असाच पाणीदारपणा दाखवा नेहमीं. ( त्याची पाठ थोपटतो )

**दौलत** : पाठीवर थोपटतां कशाला ? मघांप्रमाणं कान पिळा पुन्हां !

**जोत्याजी** : मघां गैरसमजानं तुमचा कान पिळला आणि तुम्हांला त्रास दिला, याबद्दल मला फार वाईट वाटतं !

**दौलत** : तुम्हांला वाईट वाटल्याबद्दल मला फार फार आनंद झाला !

**जोत्याजी** : चला. अगोदर हा लखोटा मला ताईसाहेबांपाशीं नेऊन दिला पाहिजे. ( त्वरेनें निघून जातो )

**दौलत** : आणि मलासुद्धां, तो लखोटा जोत्याजीरावांनीं मानेवर तरवार ठेवून काढून घेतला, म्हणून कब्जीला वर्दी दिली पाहिजे. नाहींतर बोक्यासारखा गुरगुरून, बुबुळं फिरवायला लागायचा तो कनोजी ब्राह्मण !

( जातो )

---

## प्रवेश ३ रा

( **स्थळ**—रायगड, **संभाजी** आणि **कब्जी** बोलत आहेत. )

**संभाजी** : कब्जी, गणोजीकडे गेलेली राजकुंवर अजून परत आली नाहीं ?

**कब्जी** : नाहीं हुजुर ! आणि त्या परत येतील किंवा नाहीं याची शंकाच आहे. मला तर वाटतं कीं, गणोजीचं मन वळविण्यासाठीं गेलेल्या ताई-

साहेबांचंच मन आपल्याकडे वळवून घेऊन, गणोजीनं त्यांना तिथंच ठेऊन घेतलं असावं.

**संभाजी** : पण असं कालत्रयीं घडणार नाहीं ! राजकुंवर तेजस्वी स्त्री आहे. आपल्या हितोपदेशाचा परिणाम आपल्या पतीवर कांहीं होत नाहीं असं पाहातांच, गणोजीचा बिलकुल मुलाहिजा न धरतां, ती तडक रायगडावर परत येईल.

**कब्जी** : ताईसाहेब बोलून चालून बाईमाणूस आहेत. तशांत, बऱ्याच दिवसांपासून पतिमुखाला बिचाऱ्या पारख्या झालेल्या ! त्यामुळं साहजिकच गणोजीची आणि त्यांची फार दिवसांनीं भेट झाल्यावर त्यांच्या स्त्रीहृदयांतलं प्रतिप्रेम उचंबळून आल्याशिवाय कसं राहील सरकार ?

**संभाजी** : कब्जी, एकाद्या सामान्य स्त्रीच्या बाबतींत कदाचित् तुमचं म्हणणं खरं असू शकेल; पण राजकुंवर फार निराळ्या जातीची मुलगी आहे. राष्ट्रकार्यासाठीं पतिप्रेमाचा होम करून, आमची राजकुंवर राज-संन्यासिनी बनली आहे. खरोखर तिचा कित्ता महाराष्ट्रांतील सर्व स्त्रियांनीं उचलला, तर मराठ्यांची दौलत खात्रीनें चिरस्थाई होईल.

**कब्जी** : ( स्वगत ) आणि महाराष्ट्रांतले लग्न झालेले पुरुष ब्रह्मचारी बनून गणोजीप्रमाणं वणवण फिरूं लागतील. पण अजून तुळशी कशी येत नाहीं !

**संभाजी** : हो, बरी आठवण झाली. कब्जी, गडावर कांहीं तरी कारस्थान चालू असून, फितुरीचा समंध छत्रपतींच्या सिंहासनाभोंवतीं पिंगा घालीत असल्याची कुणकुण आमच्या कानीं आली आहे; याबाबत तुमच्या कानीं कांहीं खबर ?

**कब्जी** : हो. एक दोघां कर्णपिशाच्चांनीं नुकतीच यासंबंधीं कांहीं खबर मला सांगितली आहे आणि दोनचार खानदानी इसमांची नांवंहि पण त्यांनीं कळविलीं आहेत.

**संभाजी** : काय ? ह्या कारस्थानांतील कलिपुरुषांचीं तुम्हांला नांवंहि पण कळलीं आहेत ? तर मग सांगा पाहूं त्या अधमांचीं नांवं !

**कब्जी** : सरकार, त्या व्यक्ती इतक्या थोर आहेत कीं, त्यांचीं नांवं उच्चारायला ह्या चाकराच्या जिभेला बळ नाहीं.

**संभाजी** : त्या व्यक्ती कितीहि थोर असल्या तरी कांहीं चिंता नाहीं.

तुम्ही बेलाशक नांवं सांगा. तात्काळ त्यांची चौकशी करून, त्यांच्या गुन्ह्याबद्दल त्यांना शिरच्छेदाची शिक्षा फर्मावूं. बोला लवकर.

**कब्जी** : पण हुजूर, ह्या फितुरीच्या कारस्थानांत ज्यांचा संबंध असल्याचं मला नक्की कळलं आहे, तीं माणसं खाशांच्या खास प्रेमांतलीं—अत्यंत जिव्हाळ्याचीं आहेत.

**संभाजी** : त्यांचीं नांवं तर कळूं देत अगोदर. कब्जी, हा फितुरीचा गुन्हा करणारी, प्रत्यक्ष माझी पत्नी येसूबाई किंवा भाऊ राजाराम असला——

**कब्जी** : हुजूर, हींच हींच माणसं फितुरीच्या कारस्थानांत प्रमुख आहेत. कारस्थानांचा पाया या दोघांनीं रचला आणि ताराऊ व राजकुंवर यांनीं दगड, चुना पुरविला. म्हणूनच तर गणोजी शिर्के इतका शिरजोर बनून रायगडावर स्वारी करण्यासाठीं धांवून येत आहे.

**संभाजी** : खरंच असं असेल का ? का कब्जीचा हा केवळ तर्क आहे !

**कब्जी** : मागं याच सगळ्या शिर्के मंडळींनीं हुजुरांना हुसकावून राजारामाला गादीवर बसवण्याचा केवढा कट रचला होता, त्याचं सरकारना स्मरण असेलच !

**संभाजी** : कब्जीचाच तर्क खरा असण्याचा संभव आहे.

**कब्जी** : पण त्यावेळीं, माझ्या अद्‌भुत मंत्रसामर्थ्यानं, या अकारण लुब्रेपणा करणाऱ्या आणि रायगडावर थैमान घालणाऱ्या साऱ्या पिशाच्चांना मी चूप केलं आणि सरकारस्वारीला सिंहासनावर बसवलं.

**संभाजी** : कब्जी, तुमचंच म्हणणं रास्त दिसतं; पण ह्या गोष्टीचा पुरावा तुम्ही पटवला पाहिजे.

**कब्जी** : त्याला माझी केव्हांही तयारी आहे. माझ्या भगवतीनं दिलेली माहिती चुकीची असणं शक्यच नाहीं. महाराज, काय सांगूं माझ्या आईसाहेबांचें सामर्थ्य ? परवां अमावास्येच्या रात्रीं, मी देवीच्या मंदिरांत देवीचं तीर्थ घेऊन, योगासन लावून बसलों असतांना, या फितुरीच्या कारस्थानांतील एकेका मंडळीला, भगवतीनं कान धरून आणून माझ्यापुढं उभं केलं आणि त्यांच्या गुन्ह्याचा पाढा वाचण्यास प्रारंभ केला. पापी माणसाची यमधर्मापुढं जबानी चालावी तसा तो देखावा होता सरकार. नंतर

सर्वांना माझ्या पायांवर घालून मातोश्री अंतर्धान पावल्या. ( स्वगत ) पण तुळशी कशी येत नाहीं अजून ?

**संभाजी** : कब्जी, तुमच्या त्या योगासनापेक्षां, न्यायासनापुढील चौकशी अधिक महत्त्वाची आणि जरुरीची आहे. म्हणून राणीसाहेबादि फितुरी मंडळींवरील आरोपांची शाबिती, एकदोन दिवसांत केलीत तर ठीक आहे, नाहींतर सूर्याला ग्रहण लावण्याच्या गुन्ह्याबद्दल, राहूप्रमाणं तुमचंहि डोकं मारलं जाईल; ध्यानांत ठेवा.

( **तुळशी** येते. )

**तुळशी** : महाराजांचा जयजयकार असो !

**संभाजी** : तुळशी, कां आलीस इथं ?

**तुळशी** : महाराजांच्या चरणांपाशीं एक विनंति करायला मी आलें आहें.

**संभाजी** : त्या दिवशींसारखी कांहीं वेडगळ विनंति तर नाहीं ना ?

**कब्जी** : त्या दिवशीं कसली विनंति केली होती हिनं ?

**संभाजी** : तिला पट्टराणी करण्याची.

**कब्जी** : काय पट्टराणी ? नांव तुळशी, पण अगदींच भांग प्याल्यासारखीं भलतीच विनंति केली पोरीनं.

**तुळशी** : तेव्हां सरकारच्या पायांपाशीं ह्या दासीची एक विनंति आहे.

**संभाजी** : तुळशी, तुझ्या नवऱ्याला माफी मिळाली ना ? मग जा आतां. उभयतां सुखानं संसार करा.

**तुळशी** : महाराज, आपण दयाळु होऊन माझ्या पतीला जीवदान दिलंत; या तुळशीला सौभाग्याची जोड करून दिलीत, म्हणून मीं माझ्या मंगळाईची पूजा बांधली असून, देवीला बोडण भरण्याचं ठरवलं आहे. तरी महाराजांनीं तीर्थप्रसादाला यावं अशी माझी विनंति आहे.

**संभाजी** : ( स्वगत ) देवीची पूजा पाहायला आणि तीर्थप्रसाद घ्यायला जायचं ! गरिबांनीं भक्तिपूर्वक केलेलं धर्मकृत्य आहे. स्तुत्य आहे.

**तुळशी** : मग काय ? सरकारस्वारी येणार ना पूजा पाहायला ?

**संभाजी** : नाहीं तुळशी, गडावर फितुरीचा नंगा नाच चालू असतांना आम्हांला गड सोडून मुळींच जातां येणार नाहीं.

**तुळशी** : पण आपला फार खोळंबा करणार नाहीं मीं. लगोलग घोड्यावर

मांड टाकून निघायचं आणि दीपोत्सव व पूजा पाहून आणि तीर्थप्रसाद घेऊन टाकोटाक परत फिरायचं.

**संभाजी** : सांप्रत मोठा बांका वखत् आहे. शिवाय गणोजी रायगडाजवळ येऊन ठेपला नाहीं तोंच त्याला मार्गातच अडवून त्याचा मोड करून त्याला परत फिरवायचा आमचा मनसुबा असल्यामुळं, तुझी विनंति आम्हांला मान्य करतां येत नाहीं. जा तूं.

**कब्जी** : चल जा, चालती हो. महाराज कांहीं तुझ्यासारखे रिकामटेकडे नाहींत. म्हणे पूजा पाहायला चला. सुरत बघा हिची प्रथम !

**तुळशी** : पण सरकार, ताईसाहेब परत येईपर्यंत तरी आपण स्वारीवर निघत नाहीं ना ? मग त्याच्या आधीं प्रसाद घेऊन आपण खात्रीनं परत याल. कब्जी, तुम्ही तरी सरकारस्वारीला सांगा माझ्यातर्फे.

**कब्जी** : सरकार, पोरीचा हट्ट आहे; पुरवायला कांहींच हरकत नाहीं. हें धर्मकृत्य आहे. देवीची आरास पाहून वैकुंठींची मिरास लाभेल हुजुरांना ! धर्मवीर छत्रपतींनीं गरिबांच्या धर्मकृत्याचं कोडकौतुक करायला हवं !

**संभाजी** : धर्मवीर छत्रपति ! या संभाजीच्या कर्तव्याची जाणीव कब्जींनीं अचूक करून दिली. रयतेच्या धर्मभावनांचं पोषण राजानं केलंच पाहिजे.

**तुळशी** : सरकार, गरीब दासीचा विरस करूं नका. तिथं केवळ घटका दोन घटका मोडतील. देवीचं देऊळ इथून कांहीं फार दूर नाहीं. तिथंच हा बोडण भरण्याचा समारंभ करणार आहें मी.

**कब्जी** : कांहीं हरकत नाहीं सरकार. सड्या स्वारीनिशीं झटकन् घोड्यावर मांड टाकायची आणि लगेच परत फिरायचं ! मग, काय मर्जी आहे हुजुरांची ?

**संभाजी** : कब्जी, तुमच्या सांगण्याबाहेर आम्ही नाहीं.

**कब्जी** : श्री चंडिकेची कृपा ! तुळशी, जा. मीं सांगितल्याप्रमाणं लवकर सर्व तयारी कर. महाराजांना घेऊन मी मागोमाग आलोंच.

**तुळशी** : ही निघालेंच ! ( स्वगत ) माझ्या बाबांच्या वधाचा सूड आतां चांगलाच उगवून घेतें मेल्या. ( त्वरेनें जाते )

**संभाजी** : कब्जी, पागेतून दोन घोडे तयार करून आणायला मोतद्दाराला वर्दी द्या. चटकन् जाऊन तीर्थप्रसाद घेऊन, आम्हांला रायगडावर हजर झालं पाहिजे.

**कब्जी** : शिवाय सरकार, त्याच देवीच्या समोर, रायगडावरील फितुर मंडळींच्या फितुरीचा प्रत्यंतरत्र पुरावाहि मी हुजुरांना दाखवून देईन !

( **राजकुंवर** प्रवेश करते. )

**राजकुंवर** : फितुरीचा प्रत्यंतर– पुरावा मी दाखवून देतें. दादा, तूं देवीच्या देवळांत जाऊं नकोस.

**संभाजी** : कां, देवीच्या जागीं मोंगल दिसणार आहेत मला ?

**राजकुंवर** : होय दादा ! देवीच्या देवळांत तुला नेऊन, तुझा बळी दुश्मनाच्या तरवारीला देण्याचा, ह्या-ह्या मांगाचा मनसुबा आहे.

**कब्जी** : बाईसाहेब, बेफाट बरळून या सच्चा दिलाच्या आणि पाक वर्तनाच्या ब्राह्मणावर तुम्ही नाहक दोषारोप करीत आहांत.

**राजकुंवर** : तूं सच्चा दिलाचा आणि पाक वर्तनाचा काय ! आपल्या अन्नदात्या धन्याला, बारा लाखांच्या जहागिरीच्या मोबदल्याबद्दल शत्रूच्या स्वाधीन करायला तयार होणारा तूं सच्चा दिलाचा ब्राह्मण नाहींस, तर कमअस्सल अवलादीचा अधमाधम आहेस !

**कब्जी** : ताईसाहेब, आपण राजभगिनी आहांत म्हणून आपलीं हवीं तीं बोलणीं आत्तांपर्यंत ऐकून घेतलीं; पण यापुढं मात्र तुम्ही जिभेला आवर घातला नाहीं तर या मांत्रिकाला विनाकारण छेडल्याबद्दल जारणमारणाचा मंत्र जपून तुम्हांला इथल्या इथं मातींत गाडून—

**संभाजी** : खामोष, कब्जी.

**राजकुंवर** : दादा, हा राक्षस शत्रूला फितूर असून, शिर्के आणि यांनीं मिळून छत्रपतींचे प्राण आणि हिंदवी स्वराज्य, औरंगजेबाच्या पदरांत टाकण्याचं भयंकर कारस्थान केलं आहे.

**संभाजी** : ही गोष्ट खरी असेल का ? आमच्या जिवाला जीव देणारे कब्जी आमच्याच जिवावर घाला घालायला उद्युक्त होतील का ? कब्जी, साफ दिलानं सांगा, कुंवरनं आतां तुमच्यावर केलेला आरोप—

**कब्जी** : साफ खोटा आहे. स्वतः चोरी करून, चोरीचा ऐवज दुसऱ्याच्या घरांत टाकून, अट्टल बदमाश जसा साव बनूं पाहतो, त्याचप्रमाणं आपलं पाप लपविण्यासाठीं ताईसाहेब फितुरीचा गुन्हा ह्या गरिबाच्या माथीं मारीत आहेत. जाऊं द्या हुजूर, आपण ताईसाहेबांचं बोलणं मनांत न घेतां, देवीच्या मंदि-

रांत चला लवकर. तिथं तुळशी आणि श्रीचंडिकामाता आपली वाट पाहात असतील. चला जलदी.

**संभाजी** : फितुरीचा छडा लावल्याशिवाय, आम्ही देवीच्या मंदिरांत किंवा राणीसाहेबांच्या महालांतहि पाऊल ठेवणार नाहीं. कब्जी, तुमच्या निर्दोषी-पणाचा पुरावा पटवा पाहूं !

**कब्जी** : हुजूर, चाकराच्या केल्या चाकरीची आणि इमानीपणाची एका क्षणांत अशी वासलात लागावी ना ? सरकार, मागं औरंगजेबाच्या कैदेंतून आपण आणि थोरले महाराज पेटाऱ्यांत बसून पळून आलांत, त्या वेळीं मथुरेंत ह्या गरीब ब्राह्मणानं हुजूरना आपल्या घरीं आश्रय दिला. मोंगलांना आपला संशय येऊं नये म्हणून, त्यांची खातरजमा करण्यासाठीं, आपण मराठे असूनहि ह्या ब्राह्मणानं स्वतःच्या ताटांत शिरापुरीचं जेवूं घातलं आणि आपल्या पोटच्या पोराप्रमाणं सांभाळ केला. पुढं दक्षिणेंत आल्यावर, शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर, छत्रपतींच्या सिंहासनाबाबत झगडा चालू झाला असतांना, मी हुजूरची न्यायाची बाजू उचलून धरली आणि विरोध-कांच्या नांग्या मोडून, सरकारस्वारीला सिंहासनाचा लाभ करून दिला.

**संभाजी** : आणि त्या तुमच्या उपकाराची फेड, तुम्हांला दौलतीचे दिवाण बनवून आम्ही केली नाहीं का ?

**राजकुंवर** : आणि म्हणूनच, दूध पाजणाऱ्या धन्याच्या मानेचा चावा घेण्याचा, ह्या कृष्णसर्पाचा विचार आहे. होय ना कब्जी ?

**कब्जी** : माझ्या पोटांत जर कांहीं पाप असतं आणि ताईसाहेब म्हणतात त्याप्रमाणं मला हुजुरचा प्राणच घ्यायचा असतां, तर तो महाराज मथुरेंत माझ्या घरीं आश्रयाला होते, त्या वेळीं सहज घेतां आला असता !

**राजकुंवर** : त्या वेळीं बारा लाखांची जहागीर पुढं ठेवणारा एखादा अलमगीर उभा राहाता म्हणजे या कनोजी ब्राह्मणानं असला नीचपणा त्यावेळींदेखील खात्रीनं केला असता.

**कब्जी** : हुजूर, मी स्पष्टपणें सांगतों कीं, हा कब्जी पूर्णपणें निर्दोषी आहे. माझ्या चिमण्या लेंकराची आण घेऊन सांगतों कीं, हा कब्जी फितूर नाहीं. मी जर धन्यांशीं निमकहरामी केली असेल, तर गोमांस खाल्ल्याचं पाप या ब्राह्मणाला लागेल. झालं ? आतां तरी खात्री पटेल हुजूरची ?

**राजकुंवर** : दादा, हा अधम इतका दुराचारी आणि स्वार्थी आहे कीं, जहागिरीच्या लोभानं, प्रसंगीं हा बैल शेण खायलाहि कमी करणार नाहीं.
**कब्जी** : सरकार, या ताईसाहेब, त्या राणीसाहेब, त्या ताराऊसाहेब वगैरे या साहेबांनींच शत्रूला घरांत बोलावून आणला आहे आणि छत्रपतींच्या नरडीला नख देण्याचं कारस्थान रचलं आहे. छत्रपतींच्या कारभाऱ्याचा हा कयास कधींहि चुकणार नाहीं.

**संभाजी** : तर मग खरा फितूर कोण ? राजकुंवर ? पण छे. कुंवरची नजर निर्दोषी माणसासारखी स्थिर आणि निर्भय आहे. उलट कब्जींच्या डोळ्यांत पापी माणसाची कातरता आणि चांचल्य स्पष्ट दिसत आहे ! कब्जी, तुम्हांला खाल्ल्या मिठाची आण आहे; खरें सांगा, तुम्ही शत्रूला फितूर आहांत कीं नाहींत !
**कब्जी** : हुजूर, तीनतीनदां विचारून चाकराचा दिल अजमावण्यांत काय शोभा आहे ? महाराजांच्या जिव्हाळ्याचीं हीं माणसं, महाराजांच्या जिवावर उठलीं आहेत, हें सूर्यप्रकाशाइतकं स्पष्ट आहे.

**संभाजी** : कुंवर, कुंवर, तूं खरंच फितुरीची सुरी हातीं घेऊन या तुझ्या भावाची मान चिरायला सिद्ध झाली आहेस का ?
**राजकुंवर** : दादा—दादा, काय हें ? आपल्या बहिणीबद्दल तुझ्या मनांत शक यावा ना ? दादा, पुण्यश्लोक शिवरायांच्या पोटीं माझा जन्म झाला आहे. आपला नवरा राष्ट्राच्या नाशाच्या उद्योगांत मग्न आहे असें पाहातांच मी त्यांचा त्याग करून आणि संसारसुखावर तिलांजली देऊन अशी रंडकी बनलें. परकी शत्रूपासून दख्खन दौलतीचं रक्षण व्हावं म्हणून मी रात्रंदिवस अंबाभवानीची मनोभावानं आळवणी करीत असतें. असं असतांना मी—ही तुझी धाकटी बहीण कुंवर, माझ्या भावाला - मराठ्यांच्या छत्रपतीला—मारण्याचं घोर पातक तरी करीन का रे ? (त्याच्या गळ्यांत पडून रडूं लागते.)

**संभाजी** : नाहीं बरं कुंवर ? कुंवर, एकाच पित्याच्या पोटीं आपण जन्माला आलों, एकाच वेगानं आपणा दोघांच्या धमनींतलं रक्त सळसळत असतं, आणि एकाच राष्ट्रकल्याणाच्या विचारानं आपलं उभयतांचं अंतःकरण भरून गेलं आहे. तेव्हां माझी लाडकी कुंवर शत्रूला फितूर असणं कालत्रयी

शक्य नाहीं ! कब्जी, कुंवरच्या निर्दोषीपणाचा निर्वाळा हा मराठ्यांचा छत्रपति–संभाजी–देतो आहे.

**कब्जी** : जहरी सापाला माणसानं आपल्या उशागतीं ठेवावं त्याप्रमाणं, गुन्हेगारांना खुद्द सरकारनींच पाटीशीं घातल्यावर—

**संभाजी** : खबरदार ! तशी भाषा पुन्हां उच्चाराल तर जबान छाटून टाकीन. आमची पक्की खात्री आहे कीं, कब्जी, तुम्हीच शत्रूला फितुर आहांत.

**कब्जी** : पण सरकार, मी फितुर असल्याचा पुरावा ?

( **जोत्याजी** येतो. )

**जोत्याजी** : हा पहा तो पुरावा. धनी, हा लखोटा तकरीबखानानें कब्जीच्या पत्राला जबाब म्हणून कब्जीकडे धाडला. कब्जींच्या एका नोकराकडून मीं हा जबरदस्तीनं काढून घेतला. ( लखोटा देतो. )

**कब्जी** : अरेरे ! त्या दौलतीनं घात केला सारा !

**संभाजी** : ( लखोटा वाचतो ) " आम्ही तुमच्या सल्ल्याप्रमाणं, आज रात्रौ संगमेश्वराजवळील देवीच्या मंदिरांत फौज घेऊन दबा धरून बसतों. तुम्ही ठरल्याप्रमाणं संभाजीला तिथं येऊन या. संभाजी आमच्या हातीं आला कीं, बारा लाखांच्या जहागिरीचा बादशाही हुकूम तुमच्या हातीं पडलाच म्हणून समजा. " हलकटा, गोमांस खाणाऱ्या ब्राह्मणा, हा तुझा बाप या लखोट्यांत काय लिहितो आहे ?

**कब्जी** : बघूं दे हुजूर, मला लखोट्यावरील अक्षर आणि शिक्कामोर्तब नीट पाहूं दे प्रथम ( लखोटा बारकाईनें पाहण्याचा बहाणा करतो. )

**राजकुंवर** : पाहा, तुझ्या नीचपणाचा पुरावा नीट डोळे फाडून पाहा.

**कब्जी** : हां, आतां बरोबर उलगडा झाला. सरकार, हें मोंगलांचं कारस्थान असलं पाहिजे, अथवा या गरीब ब्राह्मणाचा गळा, या फितुरीच्या चापांत अडकवून, स्वतः नामानिराळं राहण्याचा, राणीवंशांतील भरंवशाच्या भामट्यांचा हा कुटिल कावा असावा. असावा कशाला ? आहेच मुळीं ! हुजूर, तसं कशाला ? आपण अगोदर देवीच्या मंदिरांत चला. ताईसाहेबांनीं माझ्याविरुद्ध पुरावा हजर केला, त्याप्रमाणें त्यांच्याबाबतचा माझा सर्व पुरावा मी तिथं देवीच्या साक्षीनं हजरच्या समोर दाखल करतों. चला देवीच्या मंदिरांत.

**संभाजी** : ठीक आहे. कब्जी, देवीच्या प्रसादासाठीं नाहीं पण या भयंकर कारस्थानाच्या पुराव्यासाठीं व देवळांत दबा धरून बसलेल्या दुष्मनासाठीं आम्ही तुमच्याबरोबर यायला तयार आहोंत.

**कब्जी** : श्री चंडिकेची कृपा ! चलावं सरकार.

**राजकुंवर** : दादा, नको रे त्या चांडाळाची सोबत करूं. माझ्या गळयाची शपथ आहे, तूं यावेळीं तरी रायगडाबाहेर जाऊं नकोस. पाचाडापार तुझं पाऊल पडतांच, गडावर हलकल्लोळ उडेल ! आणि छत्रपतींचा प्राण वैऱ्याच्या तरवारीला बळी पडेल.

**जोत्याजी** : धनी धनी, हा जोत्याजी आपल्या प्राणांचा अडसर घालून आपल्याला असा अडवून धरील. ( पाय धरतो )

**संभाजी** : त्याला असा मोडून टाकून, मोंगलांचा मोड करायला हा संभाजी निघाला पहा.

**राजकुंवर** : दादा, मोंगलांच्या तरवारीला बळी पडण्यासाठीं तूं गडाबाहेर जाऊं नकोस.

**संभाजी** : मोंगलांच्या तरवारीला बळी पडण्यासाठीं नाहीं तर मराठ्यांच्या तरवारीचं पाणी पाजून, मोंगलांची मस्ती उतरवण्यासाठीं आणि फितुरीचा मुद्दापुरावा पडताळण्यासाठीं, आम्ही कब्जीबरोबर गेल्याशिवाय रहणार नाहीं.

**राजकुंवर** : दादा, तुला आबासाहेबांची आण आहे.

**संभाजी** : कुंवर, तूं मला आबासाहेबांची आण घालून अडवूं पहातेस, पण हिंदवी स्वराज्याच्या आणि हिंदुधर्माच्या संरक्षणासाठीं, प्राण द्यायला मागंपुढं पाहूं नकोस अशी आबासाहेबांची मला शपथ आहे. मग त्या महात्म्याच्या शपथेचा अनादर मी कसा करीन? कुंवर, तूं स्वस्थ राहा. मी फितुरीचा पुरावा पाहून आणि देवळांत दबा धरून बसलेल्या सर्व दैत्यांचा संहार करूत परत पावलीं आलोंच पहा. चला कब्जी.

**कब्जी** : जगदंब जगदंब ! ( **संभाजी** व **कब्जी** जातात. )

**जोत्याजी** काय करूं रे, धांवत जाऊन त्या हलकटाला घोड्याखालीं खेचून, पायांतल्या पायतणानं चेंचून टाकूं का ?

**राजकुंवर** : जोत्याजी, भोसल्यांच्या जयभवानीनं डावी दिली रे डावी दिली !

( **पडदा पडतो** )

## प्रवेश चौथा

[ **स्थळ—तुळापूर, औरंगजेब व तकरीबखान** प्रवेश करतात ]

**औरंगजेब** : ये मगरूर मरगट्ठोंके कायल करके, उनपर इस्लामका सिक्का जमानेका मेरा मतलब पूरा होना सक्त दुश्वार है. ये ऐसी हटेली कौम है के इनके साथ मुकाबिला करना, और फत्तेहमंदी पाना, मानो जैसे आस्मानके बिजलीको हतेलीपर पकडना है ! तकरीबखान, सिर्के और कब्जी ऐसे काफरोंसे अपना काम नहीं चलेगा. संभाजीको गिरफदार करनेका मेरा मनसुबा पूरा नहीं होगा !

**तकरीबखान** : जनाबेआली, ऐसा रंज करनेकी कुछ जरूरत नहीं है. क्यौं के, कब्जीनें अपना फर्ज आदा करनेकी ठीक तरतूत निकाली है खाविंद !

**औरंगजेब** : क्या, संभाजीको हमारे सुपूर्त करनेकी कुछ कोशीस कब्जीनें किया है ?

**तकरीबखान** : जी हां हुजूर ! अभी एक जासूद कब्जीका पैगाम लेकर आया था !

**औरंगजेब** : वो क्या कहता था ?

**तकरीबखान** : जहापन्हां, संगमेश्वरके पास काफरोंका देवीका मंदर है. उसका जुलूस देखनेके वास्ते, आज रातको, चाँद निकलनेके पहले, कब्जी संभाजीको वहाँ ले आयेगा, और उसी जगह संभाजीको धोकेसे गिरफदार करनेका सब मामला बराबर हुआ है !

**औरंगजेब** : ठीक ठीक ! तो आज अल्लाकी कुदरतसे, मै बहोत दिनसे चाहता था, वो मौका आखरी आगया !

**तकरीबखान** : शहानशहा, संभाजीको गिरफदार करनेके वास्ते जानेकी गुलाम इजाजत माँगता हुँ.

**औरंगजेब** : जाव, जाव, जल्द जाव ! दुश्मनको—काफीर संभाजीको पकडकर फौरन ले आव. खुदा तुमपर रहेम करेगा !

**तकरीबखान** : खाविंद, उस शैतानकी गर्दन मारकर, उसका सर लेकर एक लेहेजमें, बंदा आपके कदमोंपर हाजीर करेगा. ( जाऊं लागतो )

**औरंगजेब** : ठेरो ! तकरीबखान, संभाजीकी गर्दन काटनेकी तुमको सक्त मनाई है ! और संभाजी इस वख्त दुसरे किसीसे मारा जायगा, तो तकरीबखान, ध्यान रखो. फौरन तुमको कत्ल करूं गा. उसको जिंदा पकडकर, ठीक मिजाजसे ले आव ?

**तकरीबखान** : जैसी हुजुरकी राय ! ( जातो )

**औरंगजेब** : काफरोंका राजा संभाजी, मुस्तलीक मिजाज और बडा बहादूर आदमी है. उसकी शाही गर्दन, क्या कबी तकरीबखान जैसे मामुली सरदारके समशीरसे कटेगी ! नहीं नहीं, हरगीज नहीं ! उस शेरदिल संभाजीके सीनेंमें ये शहेनशहा आलमगीरके पाक समसीर घुसकर, उसका खून खूब खुषीसे पीयेगी ! मेरे समशीरको, कंबख्त सीवाजीका खून पीनेको नहीं मिला. मगर उसके अवलादका–संभाजीका–खून जरूर मिलेगा ! लेकिन जरा गौर करनेसे ये आलमगीरके दिलमें ऐसी उमंगें उठती है, की, संभाजी जैसे मरगठ्ठोंके राजाको कत्ल करनेकी बजाय, उसको पाक पैगंबरका और लाइलाहीका पाबंद बना देनेसे, हमारे मजहबका जादा फायदा होगा. सिर्फ, उसका सर, काटनेके बदले, उसके तनबदनपर इस्लामका सिक्का अच्छी तौरसे जमादिया जायगा, तो हमारा इस्लाम झिंदाबाद हो जायगा ! मुगल सलतनतकी शान बढ जायेगी और अलम दुनिया ये अलमगीर की तारीफ करने लगेगी.

( जातो. )

## प्रवेश ५ वा



( **स्थळ** : संगमेश्वराचें मंदिर, मध्यें अष्टभुजा देवीची मूर्ति आहे. दिव्याची आरास केली असून **तुळशी** व दोन **मुरळ्या** जवळ उभ्या आहेत, असा पडदा उघडतो. )

**तुळशी** : आजची आरास कशी पण नामी साधली आहे ! सर्व पूजा आटोपली असून, आतां फक्त बळी अर्पण करण्याचा विधीच बाकी काय तो राहिला आहे. एकदां संभाजी इथं आला म्हणजे त्याची खांडोळी करून देवीला नैवेद्य दाखवतें; म्हणजे पूजेची सांगता होऊन माझा सूड सफल होईल.

## पद ११ वें

( चाल : नापेळुवे )

**होई पुरा मम हेतु सारा। मनिं तोष झाला आजी खरा ।। ध्रु० ।।**
**प्रिय तात वधिला। नीचा नृपानें। बलिदान हें दे शासना ।। १ ।।**
**जरी नारी अबला। भासे जगाला। परि नागिणी आम्ही नरां ।। १ ।।**

नेहमीं उग्र आणि भेसूर दिसणारं देवीचं ध्यान, आज आपल्याला राजबळी मिळणार म्हणून किती प्रसन्न आणि आनंदी दिसत आहे! माझी मंगळाई भारीच बाई साजरी गोजरी दिसत आहे. पण संभाजीला घेऊन कब्जी अजून कसे आले नाहींत? संभाजी मोठा लहरी आणि एककल्ली राजा आहे. पुन्हां स्वारीचा इकडे येण्याचा बेत बदलला नसेल ना?

( **जोत्याजी** व **दौलतराव** साधूच्या वेषांत येतात. )

**जोत्याजी** : सटक सीताराम, हुषारीनं वागा!

**दौलत** : मुखमें राम बगलमें छुरी! जोत्याजीराव, जपून असा!

**तुळशी** : कोण हो तुम्ही?

**जोत्याजी** : आम्ही रामाचे भक्त आहोंत.

**दौलत** : रामदास आहोंत आम्ही. सटक सीताराम!

**तुळशी** : अहो भटक सीताराम, हें धनुर्धारी रामाचं मंदिर नाहीं किंवा ब्रह्मचारी बजरंगाचं देऊळहि नाहीं. हें खड्गधारी अष्टभुजा देवीचं मंदिर आहे. इथं फक्त-शक्ति उपासकांनाच आसरा मिळतो.

**जोत्याजी** : म्हणजे देवांतहि धनुर्धारी-खड्गधारी—

**दौलत** : सोंडधारी, पुच्छधारी—

**जोत्याजी** : असा भेद करून, सरसकट दीनदुबळ्यांना आश्रय न देतां, फक्त विशिष्ट लोकांनाच देवदर्शनाचा आणि पूजा करण्याचा हक्क आहे वाटतें?

**तुळशी** : हो हो थेरड्या, इथें फक्त शाक्तांनाच आम्ही आश्रय देत असतों; त्यांत तुझ्या बापाचं काय जातं रे?

**दौलत** : ( हळूच ) जोत्याजीराव, कशाला उगीच चिखलांत दगड टाकलात?

**तुळशी** : चला, चालते व्हा तुम्ही दोघे. कुठले टोळभैरव दाढ्या वाढवतात आणि बोके संन्याशी बनून हव्या त्यांच्या स्त्री–धनावर डल्ला मारतात मेले !

**दौलत** : ( स्व. ) अग सटवे ! आम्ही स्त्री–धनावर डल्ला मारतों आणि तूं नांजरीसारखी महाराजांच्या प्राणधनावर झडप घालूं पाहाते आहेस ?

**तुळशी** : व्हा चालते इथून. आतां इतक्यांत महाराजांची स्वारी येणार आहे इथं.

**दौलत** : ( स्वगत ) महाराज कशाला मरायला येताहेत मंदिरांत ?

**तुळशी** : तेव्हां इथं रिकामटेकड्या सोळभोगांचं कांहीं काम नाहीं. निघा इथून; नाहींतर या मुरळ्यांकडून दाढी धरून तुम्हांला मंदिराबाहेर घालवून देईन.

**जोत्याजी** : बाई, कृपा करून आमच्या दाढीला धक्का लावूं नका.

**दौलत** : ( स्वगत ) हो. फट्‌दिशीं निसटून जाईल आणि आमचं खरं स्वरूप बाहेर पडेल. ( उघड ) हें पाहा अम्मा.—

**तुळशी** : अम्मा ! मेल्या—

**दौलत** : चंडिका माता की जय ! मातोश्री—नव्हे बाई, मी तुमच्या दाढीला हात लावून सांगतों कीं, आमच्या दाढीला मेहेरबानी करून हात लावूं नका बरं !

**तुळशी** : अगबाई ! घोड्यांच्या टापांचे आवाज ऐकूं येऊं लागले. महाराज आले वाटतं. ए दाढीवाल्या धटिंगणांनो, चला, निघा लवकर इथून. महाराजांची स्वारी दर्शन घेऊन गेल्यावर मग या हवे तर. व्हा चालते.

**जोत्याजी** : अहो बाई, आम्हांला कब्जीनें मुद्दाम धाडलं आहे. इथं आज राजबळी अर्पण करण्याचा समारंभ होणार आहे ना ? त्या कामगिरीवर कब्जीनं आमची खास नेमणूक केली आहे.

**तुळशी** : होय का ? मग या या. बरे आलांत वेळेवर ! या इथं दडून बसा आणि मी इषारा करतांच, एक घाव अन् दोन तुकडे—

**दौलत** : किंवा दोन घाव आणि एक तुकडा !

**तुळशी** : हं, बसा इथं गाभाऱ्यांत. ( तुळशी दोघांना गाभाऱ्यांत बसवते **कब्जी** प्रवेश करतो ) कब्जी, आले का महाराज ?

**कब्जी** : हो नगारखान्यापाशीं पायउतार होऊन आतां स्वारी इकडे येईल.

**तुळशी** : बरं, त्याच्याबरोबर हुजरातीचे कांहीं स्वार !

**कब्जी** : अगदीं सड्या स्वारीनं संभाजी आला आहे. बरं, तुझी इथली सगळी व्यवस्था चोख आहे ना ?

**तुळशी** : त्याची कांहीं काळजी नको. तुम्हीं सांगितल्याप्रमाणं अगदीं बेमालूम बार भरून ठेवला आहे ! आतां संभ्या आला म्हणजे त्याला ठार करण्याची तेवढी कामगिरी बाकी राहिली आहे.

**कब्जी** : बाकी आज संभाजी दुनियेंतून नाहींसा झाला, म्हणजे काय बहार होणार आहे ! एकदां संभाजी उलथला कीं, मी रामाप्रमाणं छत्रपतीच्या सिंहासनावर बसणार आणि तुळशी, तूं सीतेसारखी माझ्या मांडीवर बसणार !

**दौलत** : ( स्वगत ) थांब लेका, तुझी मांडीच मोडून टाकतों !

**कब्जी** : तुळशी, पहिल्याच भेटींत आपल्या जहरी नेत्रबाणानं तूं मला अंकित केलंस आणि तुझ्या ठिकाणच्या एकेक अनुपम गोष्टी पाहिल्यापासून तर हा कनोजी ब्राह्मण तुझ्याभोंवतीं प्रेमाच्या आशेनें पिंगा घालूं लागला आहे.

**दौलत** : ( स्वगत ) अरे बेरडा ? एवढ्यासाठींच तूं या तुळशीभोंवतीं प्रदक्षिणा घालतो आहेस काय ?

**कब्जी** : तुळशी, हा पाहा संभाजी आला. देवीचं तीर्थ तयार आहे ना ?

**तुळशी** : हो, चांगलं घागरभर तयार करून ठेवलं आहे.

**कब्जी** : हें पाहा तुळशी, संभाजीला कांहींहि करून प्रथम निःशस्त्र केला पाहिजे; कारण सशस्त्र संभाजी आपल्या काबूंत येणं फार कठीण आहे. तेव्हां युक्तीनं त्याची तरवार काढून घेतली पाहिजे.

**तुळशी** : तें माझं काम ! अशी कांहीं बेमालूम युक्ति काढतें कीं, ज्याचं नांव तें !

**कब्जी** : तसंच, तो येतांच त्याच्या नांवाचं मोठ्यानं जयजयकार करायचा. तो पहा आलाच. हं बोला, छत्रपति संभाजी महाराज की जय ! ( **कब्जी, तुळशी** व मुरळ्या त्रिवार जयघोष करतात. संभाजी प्रवेश करतो. )

**संभाजी** : हा जयजयकार नसून भोसल्यांच्या भवानीमातेच्या करुण किंकाळ्या आहेत असं मला कां बरं वाटतं ? या दीपज्योती प्रकाशाची खैरात करीत आहेत आणि त्याचबरोबर कसल्या तरी कारस्थानाचं काजळ

ओकताहेत असा मनाला भास होतो. कब्जी, कुठं आहेत मोंगल ! आमच्या नाशासाठीं दबा धरून बसलेले ते यवनदैत्य कुठं आहेत !

**तुळशी** : म्हणजे ! असं काय करताहेत महाराज ? माझी मंगळाई आपल्या अष्टभुजा उभारून उभी असतांना, यवन इथं येतीलच कसे ?

**संभाजी** : इथंच ते हरामखोर दडून बसणार होते. पण या छत्रपतीच्या आगमनासरशीं, सारे गनीम पळून गेले वाटतं ?

**तुळशी** : कब्जी, अंधारांतून स्वारी येतांना भूतबाधा तर झाली नाहीं ? तसं असेल तर माझ्या मंगळाईचा अंगारा लावतें हुजूरना.

**कब्जी** : तुळशी, अंगारा नको आणि धुपारा नको. भूतबाधा वगैरे कांहीं नाहीं, साधी संशयबाधा झाली आहे हुजूरना. सरकार, कुठं आहेत मोंगल ? मी तिथंच सांगत नव्हतों कीं, तो लखोटा म्हणजे उद्व्यापी मोंगलांची मखलाशी आहे म्हणून ! उगीच ' लांडगा आला रे आला, ' म्हणून हुल्लड उठवून देण्याची त्यांना खोडच आहे. त्या लखोट्यावरून या गरीब चाकरावर मात्र हुजूरनीं विनाकारण गहजब केला आणि बाईसाहेबांनीं ताशेरा झाडला.

**संभाजी** : अच्छा, जाना देव ! चल तुळशी, तीर्थप्रसाद आण लवकर. आम्हांला फार वेळ थांबायला सवड नाहीं.

**कब्जी** : तुळशी, पूजा वगैरे आटोपली ना ?

**तुळशी** : बाकीची सर्व पूजा आटोपली, फक्त शस्त्रपूजन तेवढं राहिलं आहे. तेवढं करून घेतें, तोंवर स्वारींनीं जरा थांबावं. अगबाई, पण इथली माझी खांडा काय झाली ? मीं पूजेसाठीं आठवणीनं आणली होती. मग झाली काय ती ? काय करावं ? अस्सं बिनसतं सारं ! आतां मी शस्त्रपूजन कसं करूं बाई !

**कब्जी** : तुझी खांडा सांपडत नाहीं म्हणूम लगेच डोळ्यांत पाणी आणायला काय झालं ! वेडी कुठली ? अग, महाराजांची तरवार घे पूजेपुरती. असल्या पवित्र धार्मिक कार्याला महाराज नाहीं थोडेच म्हणणार आहेत !

**तुळशी** : अगबाई ! खरंच, विसरलेंच मी. सरकार, तेवढी कमरेची तरवार पूजेसाठीं मला जरा वेळ पाहिजे. देण्याची कृपा—

**संभाजी** : हो हो, जरूर; त्यामुळं माझ्या तरवारीचं पाणी तीक्ष्ण होऊन,

शत्रूसंहाराचे कामीं तिचा मला अधिक उपयोग होईल. ही घे. ( तरवार देतो. )

**तुळशी** : ( स्वगत ) कब्जी, तें म्यान तुमच्याजवळ राहूं द्या. मला नुसती तरवारच पाहिजे आहे.

**कब्जी** : ( स्वगत ) भरीव तरवार तूं घेणार आणि आम्हांला तेवढं नुसतं रिकामं म्यान.

**दौलत** : ( स्वगत ) तूं रिकामाच राहाणार बेट्या !

**तुळशी** : ( स्वगत ) आतां ही तरवार देतें देवीमागच्या भुयारांत फेंकून

( तरवार देवीमागें फेंकून देते व शस्त्रपूजन केल्याचा बहाणा करते. )

**कब्जी** : हं, झाली झाली—ना शस्त्रपूजा ? आतां तीर्थ आण लवकर.

**तुळशी** : हें घ्या तीर्थ. ( मद्याचा प्याला **कब्जीजवळ** देते. ) कब्जी, तुम्ही महाराजांना तीर्थ द्या; तोंवर मी देवीपुढील नृत्याची तजवीज करतें. चला ग. ( **तुळशी** व **मुरळ्या** आंत जातात. )

**कब्जी** : हां हुजूर, हें घ्या देवीचं तीर्थ. म्हणजे सकल श्रमांचा परिहार होऊन तरतरी येईल ( पेला पुढं करतो. )

**संभाजी** : कब्जी. आणा तीर्थ ( हात पुढं करतो. )

**कब्जी** : हुजूर, देवीचं तीर्थ असं हातावर घेऊन नुसतं आचमन करायचं नाहीं, तर पेल्यांतून पोटभर प्राशन करायचं. चंडिकामाता असं जाज्वल्य दैवत आहे आणि तिच्या तीर्थाचा असा ज्वालाग्राही प्रभाव आहे कीं, तीर्थ हातावर घेतांच हाताला लिंबाएवढे फोड येतात आणि मग त्यांना तळहातावरील फोडासारखं जपावं लागतं. शिवाय त्यांतला एक थेंब जमिनी-वर पडतांच भूकंपाप्रमाणं भूमीला भेगा पडतात. हां हुजूर, घ्या डोळे मिटून तीर्थ. चंडिका माता कीं जय !

**संभाजी** : ( पेला घेऊन वास घेतो. ) कब्जी, हें तीर्थ आहे ?

**कब्जी** : होय सरकार, देवीचं तीर्थ आहे तें.

**संभाजी** : हें तर मद्य आहे; धडधडीत दारू आहे ही.

**कब्जी** : पण हुजूर, आम्ही शाक्तपंथी लोक, तें देवीचं तीर्थ म्हणून पोटभर प्राशन करीत असतों. घ्या हें तीर्थ हुजूर.

**संभाजी** : हें देवीचं तीर्थ नाहीं; तर शेतकऱ्याच्या शिणोट्याचं धर्मजल

आहे. गांजलेल्या गरिबांच्या डोळ्यांतील हे अश्रू आहेत. रयतेच्या आंतड्यांतील पिळून काढलेलें हें रक्त आहे. हें रक्त पिण्याचा क्रूरपणा मी कदापि करणार नाहीं. ( पेला भिरकावून देतो. )

**तुळशी** : ( प्रवेश करते ) कसला आवाज झाला कब्जी ?

**संभाजी** : देवीचं तीर्थ भूमीवर सांडल्यानं भूकंपाचा आवाज झाला तुळशी ?

**कब्जी** : महाराज, काय केलंत हें ? तीर्थ फेंकून दिलंत ? चंडिकेचा कोप होईल ना आतां ?

**तुळशी** : काय ? महाराजांनीं देवीचं तीर्थ भूमीवर सांडून दिलं ? माझी मंगळाई आतां रुष्ट होणार आणि महाराजांच्या जिवाला धोका पोंचणार !

**कब्जी** : आणि महाराष्ट्राची दैना होणार !

**संभाजी** : असल्या निंद्य तीर्थाच्या त्यागानं देवी कोपली तरी मी त्याची मुळींच पर्वा करणार नाहीं. तीर्थ म्हणूनसुद्धां मी प्राणांतींहि मद्यपान करणार नाहीं.

**तुळशी** : इश्श बाई ! हा फारच सोंवळा आहे. हा विलासी राजेश्वर नाहीं, तर साधुवर्य तुकाराम आहे केवळ. बरं आहे महाराज, आतां नृत्याला सुरवात करतें. ( इतक्यांत पडद्यांत—अल्ला हो अकबर व दीन दीन अशा आरोळ्या होतात. ) अगबाई ! मोंगल आले वाटतं. आतां माझ्या मंगळाईची पूजा उध्वस्त करून ते चांळाळ मूर्तींची नासधूस करणार !

**संभाजी** : कोणाची माय व्याली आहे आमच्या मूर्तींना हात लावण्याची ? तुळशी, माझी तरवार आण अगोदर.

**तुळशी** : देतें हं ! ( पाहून ) अगबाई, इथली महाराजांची तरवार काय झाली ?

**कब्जी** : आपल्या तीर्थाचा महाराजांनीं अपमान केला, म्हणून देवीनं कोप किरणांनीं तरवारीचं भस्म करून टाकलं असावं ! ( पडद्यांत पुन्हां दीन दीन अशी आरोळी होते. )

**संभाजी** : आणारे, माझी तरवार आणा कोणीतरी. कब्जी, माझी तरवार आणा; तुळशी, तरवार आण जलदी; मला कोणी तरी तरवार द्यारे ! मोठमोठ्यानें गर्जत येणाऱ्या गनिमांना गारद करून टाकतों. आणा तरवार कुणीतरी.

( **तकरीबखान** व मोंगल येऊन गराडा घालून उभे राहतात. )

**तकरीबखान** : संभाजी, तुम हमारे कैदी हो.

**जोत्याजी** : ( प्रवेश करतो ) खानसाहेब, महाराजांना कैद करण्यापूर्वी ह्या जोत्याजीशीं आपल्याला दोन हात करावे लागतील. [ **जोत्याजी** व **तकरीबखान** लढतात. जोत्याजी जखमी होऊन पडतो. संभाजी त्याची तरवार घ्यायला खालीं वांकतो. इतक्यांत मोंगल त्याच्यावर झडप घालून त्याला पकडतात व पडदा पडतो. ]

## अंक २ रा समाप्त

# अंक ३ रा

## प्रवेश १ ला

( **स्थळ** : तुळापूर—औरंगजेबाची छावणी. बंदिखाना. साखळदंडांनीं जखडलेला **संभाजी** विचार करीत फिरत आहे. पडद्यांत दवंडी होते. )

[ दवंडी : " सब रियायाको जाहीर किया जाते है की, मोंगलका दुष्मन छत्रपति संभाजीको, बहादुर तकरीबखानसाहबने गिरफदार किया है । इस खुष खबरीकेलिये, सब लोगोंने आज ख्यालीखुशालीमें और दिलचमनमें, वख्त गुजराण करना, ऐसा शहेनशहा अलमगीरका शाही फर्मान है । ]

**संभाजी** : हरहर ! शेवटीं मराठ्यांच्या मायभवानीनं विपरीत कौल दिला. दुष्मनांच्या अफाट सेनेला त्राही भगवान् करून सोडणारा हा संभाजी आज मोंगलाचा कैदी होऊन, धर्मभ्रष्ट औरंगजेबाच्या दारीं दीनवाणा होऊन पडला आहे ! कब्जीच्या कसाई काळजाची मला कल्पना झाली नाहीं आणि म्हणून या संकटांत मी अचूक येऊन पडलों ! कारभारीच शत्रूला फितूर झाल्यावर, राजाच्या कपाळीं कैद आणि प्रजेच्या नशिबीं जुलूम—जबरदस्ती आली तर त्यांत नवल कसलं ? मोंगलांची सद्दी जोरावर आहे यांत शंका नाहीं ! मराठ्यांचा राजा गिरफदार झाला म्हणून सर्व छावणींत मोंगलांनीं मारे हैदोस चालवला आहे ! पण तिकडे रायगडावर कोण हाहा:कार उडाला असेल याची कल्पनाहि मनाला सहन होत नाहीं ! ( **गणोजी** शिर्के काळा बुरखा पांघरून दबत दबत येतो. ) अरे, पण हें काय ! अंधारांतून लपतछपत हा कोण इकडे येतो आहे ? हां समजलों, माझा शिरच्छेद करण्यासाठीं औरंगजेबानं धाडलेला हा कोणीतरी उलट्या काळजाचा मांग असला पाहिजे. कोण आहेस रे तूं ? औरंगजेबानं माझा शिरच्छेद करण्यासाठीं धाडलेला यमदूत ?

**गणोजी** : नाहीं संभाजी; तुला दुःखमुक्त करणारा देवदूत, हा गणोजी शिर्के आहे.

**संभाजी** : कोण गणोजी ? मराठेशाहीला मुसलमानांची बटीक करणारा गणोजी ! मला तूं दुःखमुक्त करणार ! अहाहा ! ये ये गणोजी, तुला उपरति होऊन तूं दुष्मनांचा पक्ष सोडून दिलास, याबद्दल माझ्या हृदयाशीं तुला घट्ट आवळून धरूं दे !

**गणोजी** : तुझ्या हृदयाशीं हृदय भिडविण्यासाठीं नव्हे तर तुझ्या निर्दय हृदयांत माझी पराक्रमी समशेर भोसकण्यासाठीं, हा रणशूर गणोजी इथं आला आहे.

**संभाजी** : तूं रणशूर ? अंधारांतून लपत छपत येऊन, दुष्मनांच्या बंदींत निःशस्त्र आणि निराधार असलेल्या आपल्या राजाची गर्दन तोडायला धांवणारा गणोजी शिर्के, शूर गडी नाहीं तर निव्वळ षंढ गडी आहे.

**गणोजी** : चूप राहा ! आतां तूं माझ्या कचाट्यांत पुरता सांपडला आहेस. तुझी गर्दन मारून शिर्क्यांच्या केल्या कत्तलीचा पुरापुरा सूड आज मी उगवून घेणार आणि माझ्या बेचाळीस कुळ्यांचा उद्धार करणार !

**संभाजी** : गणोजी, जरा शुद्धीवर ये, सूडाच्या धुंदींतून जागा हो. कर्तव्याकर्तव्याची जाणीव मनाला पटवून घे. गणोजी, आपल्या राजाच्या वधानं शिर्क्यांच्या बेचाळीस कुळ्यांचा उद्धार होईल कीं, त्या रौरवांत पडतील याचा आपल्या मनाशीं जरा शांतपणानं तूं विचार केला आहेस कां ? हिंदूंना बाटवून अवघा हिंदुस्थान इस्लामी बनवण्याचा औरंगजेबाचा अट्टाहास चालू आहे. रजपुतांना युक्तीनं आपल्या बगलेंत मारून, आतां मराठ्यांचा नायनाट करण्यासाठीं अलमगिराचे आटोकाट प्रयत्न चालू आहेत ! अशा वेळीं प्रत्येक जातिवंत मराठ्यांनीं, मायभवानीचं नांव घेऊन, श्रीशिवप्रभूच्या भगव्या झेंड्याची इज्जत राखण्यासाठीं, दुष्मनाची लांडगेतोड करून, त्याला महाराष्ट्राबाहेर हुसकावून लावला पाहिजे, असं गणोजी, तुला वाटत नाहीं काय ?

**गणोजी** : मोंगलांना महाराष्ट्राबाहेर हुसकावून लावायचं कीं नाहीं तें पुढें पाहतां येईल; पण आज तुला मात्र मी जगाबाहेर घालवणार खास. अरे, औरंगजेब तरी उद्यां तुला ठार मारणारच ना ? मग ती कामगिरी मीच पार पाडली आणि तुझं उद्यांचं मरण मीं तुला आज दिलं तर काय बिघडलं ?

**संभाजी** : अरेरे ! गणोजी, हा तुझा अधःपात पाहून काळजाचे तुकडे पडतात माझ्या ! ज्या शिर्क्यांनीं एके काळीं आपली समशेर चमकवून,

मोंगलांना ' दे माय धरणी ठाय ' करायला लावलं; ज्या समशेरीनं मराठ्यांचा भगवा झेंडा आणि जरीपटका यांची कीर्ति दिगंतराला पोहोंचवली; यवनांचें रक्त प्राशन करण्याच्या लालसेनं, जी म्यानाबाहेर पडण्यासाठीं नेहमीं उत्सुक असावयाची ती ही समशेर, गणोजी; आज तूं या छत्रपतीच्या मानेवर ठेवून मात्रागमनी मांग बनूं पाहतो आहेस अं ?

**गणोजी** : तुझ्याच अत्याचारी वर्तनामुळं तूं या शहाजोग शिर्क्याला शिरजोर गणोजी बनवलास आणि स्वतःवर हें संकट ओढवून घेतलंस ! तूं कत्तल केलेल्या आमच्या कुळांतल्या कच्याबच्यांच्या करुण किंकाळ्या आणि अनाथ स्त्रियांनीं तारस्वरांत फोडलेला हंबरडा, माझ्या कानांत एकसारखा घुमतो आहे ! तुझ्या तरवारीला बळी पडलेले माझे सगळे पूर्वज माझ्यासमोर उभे राहिले असून ' गणोजी, शिरकाणाचा सूड घे ' म्हणून मला बजावीत आहेत. नाहीं, हा देखावा माझ्याच्यानं पाहवत नाहीं. या करुण किंकाळ्या माझ्या कानांना सहन होत नाहींत. बस्स ! आतां दिरंगाई करण्यांत हांशील नाहीं. संभाजी, चल, मरणाला तयार हो. शिरकाणाचा सूड, आज तुझ्या प्राणाच्या मोलानं हा गणोजी वसूल करीत आहे.

**संभाजी** : पण छत्रपती संभाजीचे प्राण, तुझ्यासारख्या पशूच्या तरवारीला बळी पडण्यासाठीं परमेश्वरानं खास घडवलेले नाहींत. परकीयांच्या धर्मच्छलापासून, हिंदुबांधवांना मुक्त करण्याच्या ज्या महत्तम कार्यासाठीं उभी हयात मीं वेंचली आहे, त्याच धर्मसंरक्षणाच्या पवित्र कार्याच्या पूर्ततेकरतां या संभाजीचे प्राण खर्चीं पडावेत असा विधिसंकेत आहे !

**गणोजी** : हं ! धर्मसंरक्षण आतां यमाच्या दरबारीं गेल्यावर खुशाल करीत बैस. विधिसंकेत कांहीं असला तरी माझ्या तरवारीचा संकेत तुझ्या हृदयांत घुसण्याचाच आहे.

**संभाजी** : या निधड्या छातींत शिरण्यापूर्वीं तुझी पापी तरवार मध्येंच भंगून जाईल. चमत्कार पहा हवा तर.

**गणोजी** : ही पहा समशेर म्यानाबाहेर पडली. माझ्या सर्व कुलपूर्वजांनो, हा गणोजी तुमच्या साक्षीनं आज संभ्याचा शिरच्छेद करून शिरकाणाचा सूड घेत आहे. ( तरवार उगारून मारायला धांवतो. यवनवेषांत **राजकुंवर** येऊन त्याला अटकाव करते. )

**राजकुंवर** : खामोष शिर्के !
**गणोजी** : कोण तुम्ही ? मोंगल ?
**राजकुंवर** : जी हां !
**गणोजी** : मग तुमचा हा दुष्मन मी जगावेगळा करीत असतांना तुम्ही मला अटकाव काय म्हणून करतां ? व्हा. बाजूला व्हा. या संभ्याला मला ठार करूं द्या.
**राजकुंवर** : ऐसा कभी भी नहीं होगा.
**गणोजी** : क्यौं नहीं होगा ?
**राजकुंवर** : क्या शेरकी शिकार बकरीसे कभी होगी ? राजासाब, हे शेरदिल और हिम्मतमर्दोंकी गर्दन काटनेका तुम्हारा वकूब नहीं है.
**गणोजी** : ( स्वगत ) याची मुंडी छाटून माझा वकूब दाखवूं का याला ?
**राजकुंवर** : शेरका सामना शेरसेहि होता है.
**गणोजी** : खानसाहेब, तुम्हीं मोंगलांनींच या साध्या कुत्र्याला शेर शेर म्हणून शिरजोर बनवलांत आणि म्हणून तुमच्या दाढ्या ओढून त्यानं तुम्हांला हैराण करून सोडलं आहे.
**राजकुंवर** : वो कुछ भी हो. मगर मैं दावेके साथ कहता हुं की. मेरे सामने, तुम्हारे हाथसे, संभाजीका बालभी बांका नहीं होगा !
**गणोजी** : खानसाहेब, हा काय पागलपणा चालवला आहे तुम्ही ? अहो, उद्यां अलमगीर तरी संभ्याचा नाश करणारच ना ?
**राजकुंवर** : नहीं ! संभाजीको जिंदा रखनेका शहेनशहाका हुक्म है.
**गणोजी** : काय ? औरंगजेब संभाजीला जिवंत ठेवणार ?
**राजकुंवर** : हां हां; संभाजी झिंदाबाद रहेगा ! मोंगलोंके शाही तक्त के निसबत, संभाजीको जिंदा रखकर, दक्खनकी सुभेदारी बहाल करके उसको सर्फराज करनेका शहानशहाका मनसुबा है.
**गणोजी** : काय ऐकतोंय् मी हें ? संभाजी जिवंत राहणार ? बादशहाच्या हुकुमानं संभाजी जिवंत राहून, मोंगलांचा मांडलिक बनून, महाराष्ट्रांत उजळ माथ्यानं मिरवणार ! तर मग माझा सूड अपुराच राहणार काय ?
( हातांतली तरवार गळून पडते. )
**राजकुंवर** : इसवास्ते, तुम यहांसे चले जाव.

**गणोजी** : औरंगजेबानें, मला अशा रीतीनें तोंडघशीं पाडलं ! माझ्याशीं त्यानं अशी दगाबाजी करावी अं ?

**संभाजी** : गणोजी, तूं आपल्या देशाशीं दगाबाजी केलीस, त्याचं हें फळ तुला मिळालं ! संभाजीच्या नाशाकरतां खड्डा खणलास, पण शेवटीं तूं स्वतःच त्यांत कोसळून पडलास !

**गणोजी** : अरेरे ! या चमत्कारिक प्रकारानं माझ्या माथ्यांत विचारांचं नुसतं थैमान माजलं आहे ! मी माझ्या जातभाईंशीं बेमानी केली; मातृभूमीशीं निमकहराम बनून मोंगलांची जुलमी सत्ता दृढ करण्यासाठीं माझी सारी मर्दुमकी मीं खर्च केली. हिऱ्यामोत्यासारख्या माझ्या बहिणीला आणि बायकोला रंडकी करायला उद्युक्त झालों. त्याचा मोबदला औरंगजेबानं शेवटीं मला असा द्यावा ना ? मतलबी मोंगल अखेरीस आपल्या जातीवर गेला म्हणायचा !

**संभाजी** : मोंगल आपल्या जातीवर गेला, त्याचप्रमाणं गणोजी जर आपल्या जातीवर जाण्याचा पुरुषार्थ करील, तर अजूनसुद्धां मराठे वीर शत्रूला खात्रीनं धूळ चारतील.

**गणोजी** : राजकुंवरच्या त्या दिवशींच्या प्रत्येक शब्दाचा खरा अर्थ, आतां माझ्या मनाला बरोबर पटूं लागला आहे. स्वार्थसाधु औरंगजेबाचा कावा आतां माझ्या ध्यानांत आला. एका मराठ्याला हाताशीं धरून दुसऱ्या मराठ्याचा कांटा काढण्याचा औरंगजेबाचा कुटिल कावा, राजकुंवरनं आरंभींच ओळखला होता; पण सूडबुद्धीनं अंध बनलेल्या या गणोजीला तिचे बोल रुचले नाहींत आणि म्हणून भावी संकटाचा तिनं दिलेला इषारा मीं जुमानला नाहीं. अपकीर्तीच्या कलंकानं काळं झालेलं हें तोंड मी तिला आतां कसं दाखवूं ? कोणत्या शब्दांनीं मी छत्रपतींच्या पायांजवळ क्षमेची याचना करूं ?

**राजकुंवर** : शिर्के, चले जाव यहांसे !

**गणोजी** : होय, त्या दगाबाज औरंगजेबाची गर्दन छाटण्यासाठीं हा गणोजी चालला पहा. ( पडलेली तरवार उचलून त्वेषानें जाऊं लागतो. पण लगेच मागें परतून ) हो, पण त्यापूर्वीं माझ्या कृतकर्माबद्दल, या थोर पुरुषाची क्षमा मागून मला माझ्या पापाचं क्षालन करूं द्या. संभाजीमहाराज, हा

अधम गणोजी आपलं पापी मस्तक तुमच्या चरणांवर ठेवीत आहे. या दीनावर महाराजांनीं दया करावी. ( पायां पडतो )

**संभाजी** : अहाहा ! गणोजी, तुला पश्चात्ताप झालेला पाहून, आमचं हृदय भरून आलं आहे ! मायभवानी तुझं कल्याण करील. तुला सन्मार्गाला लावील !

**गणोजी** : महाराज, या गणोजीचा पुनर्जन्म झाला ! मला नवजीवन लाभलं ! आतां यापुढं हा गणोजी, छत्रपतींच्या सिंहासनाचा सच्चा सेवक आणि मोंगलांचा कट्टा दुष्मन म्हणूनच ओळखला जाईल ! महाराज, माझ्या नवजीवनाचा श्रीमन्महा या मोंगलांचा मुडदा पाडून करूं का ? ( यवनवेषधारी राजकुंवरच्या अंगावर धांवून जातो. )

**राजकुंवर** : हां हां शिर्के, या बिचाऱ्या गरीब अबलेचा मुडदा पाडून आपण काय मिळवणार ? ( पोषाख टाकून प्रकट होते )

**गणोजी** : कोण राजकुंवर !

**संभाजी** : कोण माझी कुंवर ? शाबास आहे तुझ्या साहसी वृत्तीची ! पण तूं इथं कशी आलीस !

**राजकुंवर** : छावणींत सर्व लोक शराब पिऊन गाफील आहेत असं पाहून, एका पहारेकऱ्याचा पोशाख युक्तीनं पळवून मी इथं आलें. भावाच्या भेटीसाठीं म्हणून आलें, तों स्वारीचीहि भेट झाली.

**संभाजी** : पण कुंवर, गणोजी आतां पूर्वीचा राहिला नाहीं हं; त्याचा पुनर्जन्म झाला आहे.

**गणोजी** : आणि ती जन्म देणारी संजीवनी—

**संभाजी** : कुंवर, तूं आहेस.

**गणोजी** : राजकुंवर, या तुझ्या पापी पतीला क्षमा कर. ( पायां पडतो )

**राजकुंवर** : हां हां, महाराज हें काय ? मी आपली शतशः अपराधी आहें. या गरीब दासीला महाराजांनीं क्षमा करून पदरांत घ्यावी अशी आपल्या चरणांपाशीं विनंति आहे !

**गणोजी** : पण राजकुंवर, अगोदर आपल्याला महाराजांच्या सुटकेची खटपट केली पाहिजे.

**संभाजी** : माझ्या प्राणहरणासाठीं हपापलेला औरंगजेब, मला जिवंत

सोडील अशा कल्पनेनं धडपड करणं, निव्वळ वेडेपणाचं आहे. म्हणून सांगतों गणोजी–कुंवर, माझी सुटका करण्याच्या वृथा प्रयत्नांत मोलाची घडी वेंचण्यापेक्षां, तुम्ही अगोदर रायगडावर जाऊन राणीसाहेब आणि बाळराजे यांचें सांत्वन करा. दुःखानें बेदिल झालेल्या प्रजेला धीर द्या; आणि आमच्या माग मराठेशाहीचं रक्षण करून श्रीशिवछत्रपतींचं हिंदवी स्वराज्य कायम राखा. जा ( पडदा पडतो ).

---

## प्रवेश २ रा

( **स्थळ**–रस्ता. **कब्जी** प्रवेश करतो. )

**कब्जी** : श्रीचंडिकेची कृपा ! मराठ्यांचा राजा मोंगलांच्या स्वाधीन करण्याचें माझें कारस्थान, श्रीभगवतीच्या कृपेनं सफल झालं आणि छत्रपति संभाजी एकदांचा अलमगिराचा कैदी बनला ! आज माझ्या जिवाला मणभर देवीचं तीर्थ प्राशन केल्याचा आनंद वाटतो आहे ! आजच्या दरबारांत संभाजीचा फैसल्ला होणार ! संभाजीला बाटवून जिवंत ठेवावा कीं, त्याला ठार करून त्याची ब्याद कायमची दुनियेपार रवाना करावी, ह्याबद्दल सर्व दरबारी मंडळींशीं सल्लामसलत करून अलमगीर आज अखेरचा निर्णय जाहीर करणार आहे. संभाजी मरो नाहीं तर मुसलमान होवो; आम्हांला त्याचं सोयरसुतक सारखंच आहे. चला, आतां दरबारांत जाऊन बादशहापासून बारा लाखांच्या जहागिरीची सनद मिळवितों आणि लगेच उत्तर हिंदच्या वाटेला लागतों.

[ पडद्यांत–**तुळशी** :–" **कुणि सांगा हो, कोणिकडे तरी नेला**
**देशाचा पालनवाला** । " हे चरण दोनदां म्हणते ]

अरे, ही कोण संभाजीसाठीं वेडीपिशी बनलेली स्त्री ?

**तुळशी** :–( आंतून ) " **रणमर्द खरा रायगडींचा राणा**
**चळचळां कांपवी यवना** ।।

**कब्जी** : ते दिवस गेले बरं ! संभाजी आतां रणमर्द राहिला नाहीं, तर मऊ

मेण बनला आहे. आतां खरा रणमर्द हा कनोजी ब्राह्मण–कब्जी आहे. मला पाहतांच सगळे मोंगल आणि मराठे चळचळां कांपूं लागतात, असा माझा प्रभाव आहे.

**तुळशी** : ( आंतून ) **रण झुंझाया धांवे त्यजुनी प्राणा**
**मोलाचा मोतीदाणा**

**कब्जी** : कोण म्हणतो संभाजी मोलाचा मोतीदाणा आहे म्हणून ! हरामखोर नाहीं तर. मोलाचा मोतीदाणा मी आहें. संभाजी केवळ क्षुद्र मोंगली बेदाणा आहे. ( वेडी झालेली **तुळशी** प्रवेश करते, मागून **दौलती** येतो. )

**तुळशी** : **कुणि घात नृपाचा केला.**
**कुणि तया रिपुकरीं दिधला ।**
**दाखवा अधम तो मजला**
**फोडुनी कडकडा कंठा ।**
**मारिन मी त्या पापिष्ठा ॥ १ ॥**

**कब्जी** : अस्सं ! तुळशी संभाजीच्या प्रेमानं पागल बनून अशी वणवण फिरूं लागली आहे म्हणायची !

**तुळशी** : कुठं नेलं हो महाराजांना ? आकाशींच्या ताऱ्यांनो, आमचा रायगडींचा राणा तुमच्याकडे आला आहे का ? सर्वत्र भिरभिर फिरणाऱ्या वायो, मराठ्यांचा राजा कुठं आहे तें तुला तरी माहीत आहे का ? सांगा रे, कुणीतरी महाराजांचा नक्की शोध सांगा, म्हणजे मी अश्शी पळत जाईन आणि त्या यमदूताच्या नरडीचा घोंट घेऊन महाराजांना परत रायगडीं आणीन.

**कब्जी** : ही फर्जदाची फटाकडी पोर पार बिथरून गेलेली दिसते.

**दौलत** : तुळशी, काय हा वेडेपणा चालवला आहेस ? जरा मन शांत कर. डोकं भडकूं देऊं नकोस.

**तुळशी** : ते पाहा, ते पाहा, महाराज त्या तिथं चांदोबापाशीं बसून—

**कब्जी** : कुत्र्याला खेळवताहेत.

**तुळशी** : आकाशांतल्या तेजस्वी चांदण्याचा नाच पाहाताहेत. पण बाई, तो कोण हळूच त्यांच्यामागं लपत छपत येत आहे ? हां, तोच, तोच दुष्ट चांडाळ ! महाराजांच्या गळ्याभोंवतीं मृत्यूचा कांटेरी पाश अडकवीत आहे !

पाप्या, खबरदार महाराजांच्या पवित्र देहाला स्पर्श करशील तर. काय पुढं पुढं सरतोस ! थांब; मी एकदम गरुडासारखी वर येतें आणि नीचा, तुझ्या पाशांतून महाराजांची सुटका करतें !

**दौलत** : अरेरे ! हिच्या मेंदूवर जबरस्त आघात झाल्यामुळं ही पूर्ण पागल बनली आहे. एखाद्या मांत्रिकाला हिला दाखवली पाहिजे.

**कब्जी** : मी तिला पूर्वींच पाहिली आहे.

**दौलत** : हिला एखाद्या देवऋषीच्या पायावर नेऊन घातली पाहिजे.

**कब्जी** : श्रीचंडिकेची कृपा ! जगदंब जगदंब !

**दौलत** : कोण कब्जी ? अरेरे ! मांत्रिक भेटला, पण हा दुष्ट कसा दत्त म्हणून उपटला इथं ?

**कब्जी** : दौलती, काय भानगड आहे ? ही एकटीदुकटी पोर घेऊन कुठं चालला आहेस ?

**दौलत** : कब्जी, ही माझी म्होतुराची बायको तुळशी आहे. हिला कांहीं तरी बाहेरचं लागलं आहे.

**कब्जी** : हो—हो ! बायकांना बाहेरचं वारंवार लागत असतं बेटं !

**दौलत** : तेव्हां एखाद्या चांगल्याशा मांत्रिकाला दाखवून उपचार करण्यासाठीं हिला शेजारच्या गांवीं घेऊन जातों आहें.

**कब्जी** : मग वेड्या, एवढ्या फिकीरींत काय पडलास ? मला दाखव तिला; तात्काळ बाहेरचं साफ करून टाकतों.

**दौलत** : खरंच कब्जी, माझ्यावर आपले फार उपकार होतील.

**कब्जी** : अरे, उपकार कसले त्यांत ? हा आमचा पिढीजाद धंदाच आहे. हां दौलती, आण पाहूं तुझ्या बायकोला माझ्याजवळ. काय ? झाड हालत नाहीं ? ठीक आहे. आतां झाडाला हालवतों गदगदां आणि हांसवतों खदखदां ! दौलती, तांदूळ घेऊन ये. अरे पण हो, इथं तांदूळ कुठले मिळायला ? ठीक; तूं असं कर. त्या तिथून, बोराएवढे सात खडे घेऊन ये. अरे बोराएवढे हो, नाहींतर नारळाएवढे घेऊन येशील. आतां बघतों या हट्टी झाडाच्या गमजा किती वेळ चालतात त्या. ( दौलती खडे आणून देतो. कब्जी मांत्रिकाचा आव आणून ) ॐ ऱ्हाँ ऱ्हीं ऱ्हीं ऱ्हीं चिलि चिलि छिंधी हनहन कडाम कुड्ड कुड्ड फट् ( खडा मारतो. )

**तुळशी** : कोण मांग मला खडा मारतो आहे ?

**कब्जी** : सहज खडा टाकून पाहातों आहें.

**तुळशी** : आं ? हा कोण गलेलठ्ठ ? हा मांग, बोकड कीं गाढव ?

**कब्जी** : दौलती, गाढवावर बसलेल्या बोकडखाऊ मांगानं तुझ्या बायकोला झपाटलं आहे. बरोबर सांपडलें !

**तुळशी** : अरे मेल्या मांगा, तूंच तूंच महाराजांचा गळा कापलास. बोल कुठं आहेत महाराज ? ( कब्जीचा गळा दाबते ) कुठं त्यांना दडवून ठेवलें आहेस ? बोल लवकर नाहींतर तुझं नाक चावून टाकीन.

**कब्जी** : चांडाळणी, माझी मानगुटी सोड.

**तुळशी** : नाहीं मी सोडणार ! तूं महाराजांचा घात केलास त्याचा सूड तुझा गळा दाबून मी घेणार आहें.

**कब्जी** : अग, तुझ्या नवऱ्याच्या देखत माझ्या गळ्यांत हात कशाला टाकतेस ? दौलती, तुझ्या बायकोला तूं बऱ्या बोलानं मागं घे नाहींतर माझ्या हातून भलता सलता प्रकार होईल आणि मग शंख करशील. हो करीन मी आणि निस्तरावं लागेल तुला.

**तुळशी** : तूंच निस्तर मेल्या. ज्यानं करावं त्यानंच निस्तरावं.

**कब्जी** : बाकी हिचे हात कसे दहीवड्यासारखे मृदु लागताहेत ? आणि हा दौलती इथं नसता तर हिच्या रसगुल्ल्यासारख्या रसरशीत गालांचा गोडसा पापा घेतला असता अस्मादिकांनीं !

**तुळशी** थांब मेल्या ! तुला लाथेखालींच ठेंचला पाहिजे. चांडाळानं आमच्या महाराजांचा कीं हो घात केला ! ( लाथ मारते )

**कब्जी** : ब्राह्मणाला लाथ मारतेस ? जन्मभर रंडकी राहशील ! तुळशी, चल दूर हो. तुला मांगानं झपाटलं म्हणून तूं मला बिलगतेस कीं काय ? फारच शहाणी आहेस. दौलती, तुझ्या बायकोला मागं ओढ पाहूं ! मीं झाडाला तपासून पाहिलं, पण मला बाहेरचं कांहींच सांपडलं नाहीं. तेव्हां इथं मांत्रिकाचा इलाज कुचकामाचा आहे. बाकी दौलती, तुझ्या बायकोकडे बारकाईनं पाहिलं म्हणजे हें सगळं ढोंग आहे अशी खात्री पटते. भुताच्या नांवानं वाटेल त्याच्या गळ्यांत पडण्याची हिला खोड असावी. अरे, वेडाचा बुरखा पांघरून, वेडावांकडा व्यवहार करण्याची पुष्कळशा बायकांना

संवयच असते. जाऊं द्या. असल्या क्षुल्लक प्रकरणांत पडण्यापेक्षां मला अगोदर दरबारला गेलं पाहिजे; कारण बारा लाखांची सनद आज बादशहाकडून मला मिळणार आहे. जगदंब ! ( जातो )

**तुळशी** : सुटलासरे काळतोंड्या कब्ज्या ! महाराजांना काळाच्या तोंडांत ढकललंस कसाबा ! माझी मंगळाई तुझ्यासारख्या डोमकावळ्याला नरकांत लोटल्याशिवाय मुळींच राहणार नाहीं. ( '**कुणि सांगा हो**' हें पद पुनः सर्व म्हणते. )

**दौलत** : आतां काय करावं या भोगाला ? संभाजी महाराज मेले, अशी हिची समजूत झाली आहे आणि म्हणून हिचं डोकं फिरलं आहे. तेव्हां आतां असं करावं. तुळशी, असं काय वेड्यासारखं करतेस ? अग, महाराज अजून जिवंत आहेत. ( तुळशी हळूहळू भानावर येते. )

**तुळशी** : काय, महाराज जिवंत आहेत ? काळानं त्यांना जिवंत सोडलं ? अहाहा ! माझी मंगळाई महाराजांना उदंड आयुष्य देवो ! सख्या, कुठं आहेत महाराज ? संभाजी महाराज कुठं आहेत ?

**दौलत** : चल माझ्याबरोबर. मी तुला महाराजांचं दर्शन घडवतों.

[ जातात. ]

---

## प्रवेश ३ रा

( **स्थळ** : तुळापूर. औरंगजेबाची छावणी, मध्यभागीं रिकामे सिंहासन असून त्याच्या डाव्या बाजूस **तकरीबखान**, इतर सरदार व **कब्जी** आसनावर बसले आहेत; व उजव्या बाजूला **वजीर** व **काजी** बसले आहेत, इतक्यांत ललकारी होते. )

**चोपदार** : निगाह रुबरू ! निगाह रुबरू ! खुदावंत आलमगीर बादशाहाकी सवारी आ रही है. ( **औरंगजेब** येतो आणि सिंहासनावर जाऊन बसतो ). आस्ते कदम, निगा रखो शहेनशाहा खडी ताजीम. नजर दौलत जादा. आपापने मिसलसे बैठिये.

**औरंगजेब** : मेरे सलतनके वफादार और बहादुर सरदार, खुदाकी कुदरतसे आजका मुबारक दिन आगया, इसवास्ते मैं पाक पैगंबरका, और

अल्लाहुतालाका शुक्रय्या आदा करतां हूं. बहादूर सरदार तकरीबखाननें संभाजीको गिरफदार करनेका भारी काम, बडे अकलमंदीसे करके, हमारे सलतनतकी शान बहद्द बढा दियी है. इसलिए, उनको सरफराज करना जरूर है. तकरीबखान, ये तुमारे बहादुरीकेवास्ते 'फतेह आलम' की किताब और समशेर तुमको बहाल कियी जाती है. ( भालदार एका ताटांत पोषाख व तरवार घालून तकरीबखानास देण्यासाठीं बादशहापाशीं देतो व तो नुसतां स्पर्श करून तकरीबखानाला देण्यासाठीं आज्ञा देतो. भालदार तकरीबखानास देतो. तो घेऊन तकरीबखान लवून कुर्निसात करतो. )

**कब्जी** : आतां मलामुद्धां एखादी पदवी मिळणार खास.

**औरंगजेब** : अच्छा, वझीरसाहेब —

**कब्जी** : हुजूर, संभाजीला पकडण्याची कामगिरी, एकट्या खानसाहेबांनीं केलेली नाहीं, तर त्यांत ह्या कनोजी ब्राह्मणाचाही मोटा वांटा आहे. तेव्हां मलाहि पदवी देण्याची बादशहांनीं कृपा करावी. असा माझा अर्ज आहे. हो, तुम्हीं आपणहून पदवी देत नाहीं तेव्हां मला ती मागूनच घेतली पाहिजे.

**औरंगजेब** : हां हां, कब्जीबाबा, तुमकोभी 'कनोजी कव्वा' ऐसा किताब नजर किया जाता है.

**कब्जी** : कनोजी कव्वा ? ही पदवी कां शिवी ?

**औरंगजेब** : काफीर राजा कैद हुवा, मेरा ख्वाब पुरा हुवा, शेर तो पिंजडेमें आकर फसगया. अभी उसका फैसला कैसा करना, इसके बारेमें मेरे दिलमें बडी हलचल मच रही है. संभाजीको कत्ल करना ठीक होगा, या उसके दिमागपर इस्लामका सिक्का जमाकर, उसको मुसलमीन बनाना ठीक होगा ? काजीसाब, वजीरसाब, सब सरदार, तुमारी क्या राय है ! मुझे यकीन है कीं, तुम ताजतख्तके वफादार सरदार, और मजहबके दिलदार खिदमतगार होनेसें इसवक्त ठीक सलाह देकर, हमारे सलनतकी बाजी, तुम अच्छी तौरसे जितेंगे. तो काजीसाब, अव्वल तुमारी राय क्या है वो कहो.

**काजी** : जन्हांपन्हां, काफीरको मुसलमीन करनाहि मुनासिब है.

**वजीर** : परवरदिगार, संभाजीको मुसलमीन करनेसे काम नहीं चलेगा. जिस शैतानने आजतक बादशहाको बेहरम बनकर सताया है, उसका खात्मा करनेसेहि, हमारी मुस्लीम सलतनत आबादी आबाद हो जायगी !

**नकरीबखान** : जनाबेआली, मरगठ्ठोंके राजाको कत्ल करनेसे, मोंगलोंकी बलाय तो नहीं होगी मगर, जादा मुसीबतोंको झेलनेका, खौफनाक वख्त आ पहुंचेगा. इसवास्ते, उसको मुसलमीन करना मुमकिन है.

**कब्जी** : हुजूर, संभाजीला मारावा आणि मुसल्मान करावा, असा माझा दुटप्पी सल्ला आहे.

**औरंगजेब** : ये कैसा बनेगा ?

**कब्जी** : खाविंद, बनवला म्हणजे वाटेल त्याला बनवतां येतं आम्हां ब्राह्मणांना. अहो सरकार, संभाजीला अगोदर ठार मारा आणि मग त्याला तुमच्या धर्माच्या भट्टींतून भाजून काढा.

**औरंगजेब** : तुम बेवकूब है !

**कब्जी** : ( स्वगत ) हें सांगायला बादशहा कशाला पाहिजे ? ( उघड ) पण खाविंद, माझ्या सल्ल्यानं, बादशहांच्या दोन्ही इच्छा पूर्ण होणार आहेत. मराठ्यांच्या राजाला मुसलमान करण्याचं श्रेय मिळून, वर दुष्मनाला जमीनदोस्त केल्याचं पुण्य बादशहांना लाभणार आहे !

**औरंगजेब** : ऐसी बेतुकी बाते बंद करो; और जल्द हमारी एक राय क्या है वो कहो.

**कब्जी** : ठीक आहे; एक मत सांगतों. तर मग हुजूर, संभाजीला ठार करणंच राज्याच्या हिताच्या दृष्टीनं आणि मोंगलांच्या प्राणांच्या दृष्टीनं इष्ट आहे. शिवाय संभाजी कडवा हिंदु असल्यामुळं, तो धर्मांतर करणं शक्यच नाहीं. बरं, यदाकदाचित् तो मुसलमान व्हायला तयार झाला—नव्हे मुसलमान झाला—तरी तो मोंगलांच्या मिशा उपटायला थोडाच भिणार आहे ? नुसतं पाणी शिंपडून आणि नमाज पढवून त्याच्या अंतःकरणांतले, अभिजात हिंदु संस्कार कधींतरी नष्ट होणार आहेत का ? खाविंद, साखरेचीं पुटं दिल्यानं कार्ल्याचं केळं आणि जोरजोरानं कान ओढल्यानं, घोड्याचं गाढव झालं आहे का कधीं ? म्हणून म्हणतों हुजूर, संभाजीला मारून टाकावा हेंच ठीक.

**औरंगजेब** : संभाजीको कत्ल करना फजूल है. क्यों कीं, दुष्मनको नेस्तनाबूद करने की बजाय, उसको मुसलमीन करनेसेहि, हमारे मजहबका ज्यादा फायदा होनेवाला है. अगर मराटोंका राजा मुस्लीम बन जायगा, तो

उसका सबक सब रियाया खुशीसे उठायेगी. और कुलमुल्क इस्लामी होकर, आलम दुनियामेसें काफरोंकी अवलाद बेबुनियाद हो जायगी तो संभाजीको मुसलमीन करनाहि ठीक होगा. चोपदार, कैदीको अंदर ले आव.

**चोपदार** : जी हां. ( चोपदार जातो )

**कब्जी** : हुजूर, मला एकदां तेवढी बारा लाखांची सनद बहाल करण्याची मेहेरबानी करावी.

**औरंगजेब** : हां हां, जरा ठेर जाव. पहिले संभाजीका इन्साफ करूंगा, और फिर तुम्हारा फैसला करूंगा.

( चोपदार बंदिवान **संभाजीला** घेऊन येतो. त्याच्याबरोबर चार सशस्त्र अरब असतात. )

**औरंगजेब** : इस्लामका दुष्मन !

**संभाजी** : हिंदूंचा हाडवैरी !

**वजीर** : काफीर कैदी, बादशहाको कुर्निसात कर.

**संभाजी** : दुष्मनापुढं गर्दन झुकवण्याची ह्या संभाजीला संवय नाहीं. लोकांचे मुजरे घेण्याचा छत्रपतींचाच शिरस्ता आहे, बादशहानंच माझ्यापुढं अदबीनं मुजरा ठोकला पाहिजे.

**कब्जी** : चूप राहा. संभाजी, तूं रायगडावर नाहींस, तर शहानशहाच्या छावणींत, माबाप मोंगलांचा कैदी आहेस; तेव्हां मुकाट्यानं मुजरा करून मोकळा हो, नाहींतर बादशहाचा कोप होईल तुझ्यावर.

**संभाजी** : तुमच्यासारख्या कुत्र्यांनीं पाहिजे तर पातशहाचे पाय चाटून आणि गोंडा घोळून त्याची मर्जी राखावी; ह्या संभाजीला बादशहाच्या रागाची वा लोभाची बिलकुल पर्वा नाहीं.

**वजीर** : जबाब बंद कर और पहिले कुर्निसात कर. नही तो जबरन कुर्निसात करवाया जायगा.

**संभाजी** : हा मराठ्यांचा छत्रपति, आबासाहेबांच्या पवित्र समाधीला वंदन करील, श्रीसमर्थांच्या पुण्यपावन चरणांवर डोकं ठेवील, भोसल्यांच्या कुलस्वामिनी भवानी मातेपुढं साष्टांग दंडवत घालील; पण वैऱ्यापुढं आपलं शीर एक रेसभरहि वांकवणार नाहीं.

**कब्जी** : चोपदार, वांकवा संभाजीची गर्दन.

**औरंगजेब** : सबूर. शेरको जादा छेडनेसे सब मामला बिघड जायगा. अच्छा, जानादो. संभाजी, आज तीस बरसकेबाद, तुमारी और हमारी, मुलाखत होनेका मौका आया है. मगर वो वख्त और आजका मर्तबा इसमें जमीन अस्मानका फर्क है. उस दिन तूं शहेजादा था, और आज एक मामुली कैदी है. तेरे किस्मतनें आखरी तुझे धोका दिया.

**संभाजी** : माझ्या किस्मतनं नव्हे, तर माझं अन्न खाऊन निमकहराम बनलेल्या हलकटानं मला धोका दिला आहे.

**कब्जी** : आतां मला हलकट म्हण किंवा पाजी म्हण, मला त्याची मुळींच दिक्कत नाहीं. कारण कैद्यांच्या शिव्यांचा भडिमार आणि दांत पाडलेल्या सापाचे फूत्कार दोन्ही निष्फळ होत असतात.

**औरंगजेब** : संभाजी, अबी तूं बेताकद और बेहिंमत हुवा है.

**संभाजी** : संभाजी, बेताकद आणि बेहिंमत झाला आहे कीं काय तें अजमावून पाहाण्यासाठीं, बादशहांनीं मला मोकळा करून हातीं तरवार द्यावी क्षणभर, म्हणजे माझ्या मनगटांतील मर्दुमकी मौजुद आहे कीं नाहीं तें दाखवतों. बादशहाच्या हातांतील माळेचा मणी मागं सरकण्याच्या आंत, समशेरीच्या एकाच फटकाऱ्यानं, ह्या सर्व सरदारांच्या मुंड्या छाटून, वरच्या छताला त्यांच्या हंड्या करून टांगल्या नाहींत, तर मराठ्यांची अवलाद सांगणार नाहीं.

**कब्जी** : हुजूर, मला लवकर सनद द्या. नाहींतर हा झुंजार गडी, माझं झुंबर करून छताच्या मध्यभागीं लटकावून देईल. खाविंद, तेवढी बारा लाखांची सनद द्या जलदी.

**औरंगजेब** : हां हां, सनद तो जरूर देनां चाहिये. चोपदार, कोतवालसाबको बोलो, के हमारे हलाल नामकें हाथीको मस्त करके जल्द तयार करो——

**कब्जी** : काय ? हत्तीवरून मिरवीत जहागिरीवर आमची रवानगी होणार ? वाहवा ! बादशहाला माझी चंडिमाता सलामत राखील. चला चोपदार, हत्तीवर अंबारी चढवायला सांगा. सोंडेला रंगरंगोटी करा. चला.

**औरंगजेब** : और ये कनोजी कब्जेको, उस हाथीके पावके नीचे, कुचल कुचलकर मार डालनेका हमारा हुक्म कहो.

**कब्जी :** म्हणजे ! हत्तीच्या पाठीवरून आम्ही जहागिरीवर जाण्याऐवजीं त्याच्या पायाखालीं चेंगरून आमचा चेंदामेंदा होणार ? हुजूर, खुद्द मराठ्यांच्या छत्रपतीला मी तुमच्या सुपूर्त केलं, एवढी जाज्वल्य राजनिष्ठा प्रकट केली: आणि, त्याचं बक्षीस काय तर हत्तीच्या पायाखालीं चिरडून मारण्याची शिक्षा ! अरे, ही काय मोंगलाई आहे का झोटिंगशाही आहे ?

**औरंगजेब :** तेरे निमकहरामीका ये नतिजा है !

**कब्जी :** पण मी संभाजीशीं निमकहराम झालों असलों तरी बादशहाशीं आजतागायत निमकहलालीनंच वागलों आहें. मोंगलांच्या राज्यांत निमकहलालीचा नतिजा जर अशा रीतीनं होऊं लागला, तर असली सैतानी सत्ता माझी चंडिकामाता जाळून खाक करून टाकील.

**औरंगजेब :** कुत्तेके चिल्लानेसे आफताबकी रोशनी तनिकभरभी कम नहीं होती ! जो बदमाश अपने मालिकको धोका देता है, वो एकदिन हमकोभी दगा करेगा. इसवास्ते, ऐसे फरेबीजालीमको, जहन्नममें मिला देनाहि मुनासीब है. चोपदार, ले जाव ए बदमाषको.

**कब्जी :** श्रीचंडिकेची इच्छा ! संभाजी, मी तर आतां मरणारच, पण तूं जर जगला वांचलास तर या अलमगिराचा कांटा काढल्याशिवाय राहूं नकोस !

( चोपदार कब्जीला घेऊन जातो )

**औरंगजेब :** गधेकी अवलाद ! अच्छा, संभाजी, अभी तेरा फैसला ! संभाजी, तेरे बहादुरी और हिंमतगारीपर ये अलमगीर निहायत खूष है ! इसवास्ते मैं तुझे जिंदा छोडकर आजादी बहाल करनेको तय्यार हूं. मगर—

**संभाजी :** बादशहाची काय इच्छा आहे ?

**औरंगजेब :** तुझे मुसल्मीन बनाना चाहिए.

**संभाजी :** काय ? मी मुसलमान होऊं ?

**औरंगजेब :** हां हां. तूं इस्लामी बनजायगा, तो तुझे तेरी जान और मनसबभी मिलेगी.

**संभाजी :** तुझ्या दीड दमडीच्या मनसबीसाठीं आणि माझ्या कवडी किंमतीच्या प्राणासाठीं मी माझा मौल्यवान् धर्म सोडून देऊं ?

**औरंगजेब :** सिर्फ जान बचानेके वास्ते !

**संभाजी** : स्वधर्मावर पाणी सोडून प्राणाचा बचाव करण्याचा हिंदूंचा रिवाज नाहीं, तर पंचप्राणांची आहुति टाकून, धर्मवन्हि प्रज्वलित राखण्याचा आम्हां आर्यांचा बाणा आहे.

**औरंगजेब** : काफरोंकी खराब हालत देखकर, मेरे दिलमें रंज पैदा होता है. इसवास्ते सब काफरोंको इस्लामी बनाकर, उनके लिये ताबाका दरवाजा खुला करनेका ये अलमगीरका इरादा है. संभाजी, मेरा तुझे सीधा सवाल है. तूं मुसलमीन बननेको राजी है ?

**संभाजी** : उलट बादशहाला माझा खडा सवाल आहे कीं, तूं हिंदू व्हायला तयार आहेस का ? तुझ्या बेटीला माझी बिब्बी करतोस ?

**औरंगजेब** : खामोष !

**संभाजी** : घुस्सा आला वाटतं बादशहाला ? प्रत्येकाला आपल्या धर्माचा किती कडवा अभिमान असतो याची जाणीव बादशहाला स्वानुभवावरून आली पाहिजे. अलमगीर ज्याप्रमाणं हिंदु होणं शक्य नाहीं, त्याचप्रमाणं हा संभाजी मुसलमान होणं शक्य नाहीं ! मराठ्यांच्या छत्रपतीला मुसलमान केला, म्हणजे 'यथा राजा तथा प्रजा' ह्या न्यायानं सारी दख्खन मुसलमान बनेल आणि मग बृहन्महाराष्ट्रच काय, पण अवघा हिंदुस्थान दिल्लीपतीच्या एकछत्री आणि एक हुकमी इस्लामी सत्तेखालीं, आपल्याला अनायासें आणतां येईल, हा अलमगिराचा अंतस्थ कावा आम्ही पूर्ण जाणतों.

**औरंगजेब** : देख संभाजी, जरा गौरकर. सोच समजकर पेशाव ! मेरा रौब तुझे मालुम है ? " अभी देखाही नहीं तूनें मेरा जाहोजलाल । कबिले रश्क हैं दुनियामें हरेक मेरा कमाल । बहते दरियाको अभी रेतसे बदतर करदूं ! लोहेको मोम करूं और मोमका पथ्थर करदूं " ये मेरी ताकद है, मालूम है ?

**संभाजी** : बादशहाचं सामर्थ्य मला माहीत आहे. बापाला बंदींत टाकून भावांना ठार करणाऱ्या व अन्यायानं दिल्लीच्या तख्तावर बसलेल्या, तसंच आबासाहेबांना सन्मानानं बोलावून, आग्र्यास त्यांना दगाबाजीनं अटकबंद करणाऱ्या, ह्या बदमाष बादशहाचं सामर्थ्य सर्व दुनियेला दखल झालं आहे.

**औरंगजेब** : बदकार ! ऐसी बेगुमान बातें करके मेरे रहेम दिलमें जलन क्यौं पैदा करता है ? ये वख्त निकल जानेकेबाद, जान जानेका वख्त

आयेबिगर कैसा रहेगा ! जरा सोच कर. तूं मुसलमान बनेगा तो तुझको देहलीका तख्त बहाल करूंगा.

**संभाजी** : दिल्लीचं तख्त म्हणजे बादशहाच्या बापाचाच माल जणूं काय ? तें तख्त प्रतापी पांडवांचं, पराक्रमी पृथ्वीराजाच्या मालकीचं आहे. तें आमचं तख्त आम्हांलाच बहाल करण्याचा, ह्या भुरट्या बादशहाला आणि उपऱ्या अलमगीराला काय अखत्यार आहे !

**औरंगजेब** : बेअदब. ये अलफाज बंद कर ! जबान बेलगाम होगी तो जान निकल जायगी.

**संभाजी** : प्राण गेला तरी बेहत्तर, पण मी धर्मत्याग करणार नाहीं ! हा संभाजी धर्मासाठीं जगला आणि धर्मासाठींच मरणार !

**औरंगजेब** : तूं फजूल इतनी जिद्द करता है. मौतका सिकार तूं हकनाक होता है.

**संभाजी** : मृत्यूचा विडा उचलूनच आम्ही मराठे पाळण्याबाहेर पाऊल टाकीत असतों. **धर्मरक्षणासाठीं एकदांच काय, पण लाखदां मृत्यूला कवटाळायला हा संभाजी तयार आहे ?**

**औरंगजेब** : तेरे तनबदनके टुकडे टुकडे कटवाकर, गीदडों और कुत्तोंके सामने फेंक दिये जायेंगे.

**संभाजी** : या संभाजीच्या नसानसांतील धर्मरक्षणाचा बाणा, माझ्या शरीराचं मांस भक्षण करणाऱ्या कोल्ह्याकुत्र्यांच्या आणि घारीगिधाडांच्या देहीं संचरून,मावळमराठ्यांप्रमाणेंच हे प्राणीहि तुम्हां मोंगलांना फाडफाडून खातील.

**औरंगजेब** : देखते हो क्या अरब, समशेरसे काफीरको कत्ल करो.

**संभाजी** : अहाहा ! आतां मराठ्यांच्या भगव्या झेंड्यावर माझ्या —ह्या छत्रपति संभाजीच्या—रक्ताचा अमर स्वस्तिक झळकूं लागेल आणि त्याच्या नित्य दर्शनानं, विस्कटलेला व हतहिंमत झालेला महाराष्ट्र सुसंघटित आणि तेजस्वी बनून, मोंगलांना अटकेपार पिटाळून लावील; आणि बादशहा, मी तुला अखेरचें बजावून ठेवतों कीं, ह्या भूमीवर पडलेला माझ्या रक्ताचा सडा महाराष्ट्राची जहाल भूमि क्षणभरहि सहन करणार नाहीं. छत्रपतीच्या वधाचा सूड, शेवटीं बादशहाला या दक्षिणेंतच दफन करून वसूल केला जाईल ?

पुण्यश्लोक आबासाहेब, हा तुमचा पुत्र स्वधर्मासाठीं प्राणांची आहूति देऊन आज ‘ अमरशहीद ’ होतो आहे. मर्दांच्या महाराष्ट्रा, हा ‘ **धर्मवीर संभाजी**’ तुला अखेरचा दंडवत घालीत आहे. ( संभाजी दंडवत घालतो. चोहोंबाजूंनीं अरब भाले भोंसकतात. पडदा पडतो. )

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥